

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका







# अनुक्रमणिका



■

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळ पुरस्कृत
महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

( अंक २०९ एप्रिल-जून १९७९ )

संपादक
आनंद यादव

संपादन समिति
व. दि. कुलकर्णी
माधव कानिटकर
वसन्त सावन्त

मुद्रक
चिं. स. लाटकर
कल्पना मुद्रणालय, पुणे ४११ ०३०

प्रकाशक
माधव कानिटकर
कार्यवाह, म. सा. परिषद, पुणे ४११ ०३०

मूल्य पाच रुपये

अनुक्रमणिका








# संपादकीय

---

स्नेहपूर्वक नमस्कार.

मार्च १९७९ मध्ये महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या त्रैवार्षिक निवडणुका झाल्या आणि नवीन पदाधिकारी व कार्यकारिणी सिद्ध झाली. त्यांच्या पहिल्या सभेतच विविध कार्यासाठी समित्या नेमण्यात आल्या. माझ्यासारख्या संपादनाच्या दृष्टीने अननुभवी असलेल्या ललित लेखकाकडे पत्रिकेच्या प्रमुख संपादकाची जबाबदारी देण्यात आली. संपादन-समिती आणि इतर काही सल्लागारांच्या मदतीने आता येती तीन वर्षे हे कार्य करावयाचे आहे. महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेचे व मराठी साहित्याचे रसिक, समीक्षक, लेखक या सर्वांचेच या बाबतीत साहाय्य लागणार आहे. ते मिळेल या भरवशावरच हे काम हाती घेतलेले आहे.

संपादनाची सूत्रे हाती घेतल्यावर काही गोष्टी नजरेस आल्या. पहिली महत्त्वाची बाब म्हणजे 'पत्रिके'साठी करावयाचा खर्च लक्षात घेता पत्रिकेवर पृष्ठसंख्येची मोठी मर्यादा पडणार आहे. त्या मर्यादेत राहूनच संपादनकार्य करणे अपरिहार्य आहे. त्यामुळे मनात अनेक संकल्प असूनही त्या सर्वांना मूर्त आकार देता येणे कठीण होणार आहे.

म्हणून कोणत्या गोष्टींना अग्रक्रम द्यावयाचा याचे भान सतत ठेवावे लागणार आहे. त्याचबरोबर 'पत्रिकेच्या' आतापर्यंत होऊन गेलेल्या अनेक मोठया संपादकांनी जी परंपरा निर्माण केली आहे तीही सांभाळणे आवश्यक आहे. त्यामुळे प्रत्येक बाबतीत 'निवड आणि अग्रक्रम' ही ठेवावीच लागणार आहेत. ही निवड आणि अग्रक्रम ठेवतानाही नवी समीक्षादृष्टी, नवा साहित्यविचार, कालौघ लक्षात घेता निर्माण होणारे अर्थपूर्ण असे नवे साहित्य, नव्या साहित्यविषयक चळवळी, स्वातंत्र्योत्तर काळातील साहित्यविषयक नवे भान, आजवर दुर्लक्षित राहिलेल्या पण आता समाज-प्रबोधनाच्या प्रक्रियेत नव्याने जाग आलेल्या सामाजिक स्तरातील साहित्य-निर्मिती याकडे अधिक लक्ष देणे जरुरीचे आहे असे वाटते. त्या दृष्टीने

अनुक्रमणिका

विविध विषयांची व वाङ्मयीन प्रश्नांची तात्त्विक बाजू समजून देणारी टिपणे पत्रिकेच्या लेखकांनी अवश्य पाठवावीत. इतरही काही सूचना करावयाच्या असतील तर त्या अवश्य कराव्यात.

वाङ्मयीन विचारांना पूरक आणि पोषक तरी व्यापक प्रमाणावर सर्वत्र सर्जनशील साहित्यिकांना आणि समीक्षक व रसिक यांनाही उपयुक्त होईल असा 'निर्मिति-प्रक्रिये'संबंधीचा विचार पत्रिकेतून सुरू व्हावा असे वाटते. 'निर्मितिप्रक्रिये'-संबंधीचा विचार मराठीमध्ये पुरेसा गंभीरपणे झालेला आहे असे वाटत नाही. यासंबंधीचा पुष्कळसा विचार प्राथमिक पातळीवर किंवा 'आत्मिक, दैवी शक्ती, स्फूर्तीचा क्षण' अशा 'अलौकिक' पातळीवर रेंगाळताना दिसतो. हा विचार 'पत्रिकेत' सुरू झाला तर अनेक ललित लेखकांच्या निर्मिति-प्रक्रियेला तोंड फुटेल व ही मंडळी या दिशेने लिहिती होतील असे वाटते.

पत्रिकेचा 'परीक्षण'-विभाग संपादक, लेखक, समीक्षक व रसिक वाचक या सर्वांच्याच दृष्टींनी असमाधानकारक राहिलेला दिसतो. येथून पुढे तर पृष्ठसंख्येच्या मर्यादेमुळे या विभागाची आणखी अवघड परिस्थिती होणार आहे. अशा वेळी अगदी निवडक पुस्तकांवरच परीक्षण देणे शक्य होणार आहे. ही परीक्षणेही थोडक्यात लिहिलेली तरी अर्थसंपृक्त, त्या त्या पुस्तकांच्या बाबतीत महत्त्वाचे वेगळे तेवढेच सांगणारी असणे आवश्यक होऊन बसणार आहे. अशा परिस्थितीत परी-क्षणांची काही वेगळी सूत्रमय पद्धती समीक्षकांना अवलंबिता आली तर त्यांनी ती अवश्य अवलंबून पाहावी.

वास्तविक पाहता पत्रिकेच्या सर्वच लेखकांना अशी विनंती करावीशी वाटते की, पत्रिकेकडे पाठवावयाचे कोणतेही लेखन अडीच ते तीन हजार शब्दांच्या मर्यादे-तीलच असणे अपरिहार्य होऊन बसणार आहे. अशा परिस्थितीत जे काही लेखात म्हणावयाचे आहे ते मार्मिकपणे, अचूकपणे, मोजक्या शब्दात, फाटे न फोडता, लकबींचे अकारण येणारे शब्द व शब्दप्रयोग काढून टाकून, द्विरुक्ती टाळून, विषयापुरतेच प्रतिपादन करणारे, सघन आणि गोळीबंद स्वरूपात असणे जरुरीचे आहे. अशा प्रकारच्या लेखनाचे 'पत्रिकेत' नेहमीच स्वागत केले जाईल. संपादकीय हात अगर कातरी न फिरवता लेखने प्रसिद्ध व्हावीत अशी संपादकाची इच्छा असते. त्या दृष्टीने फापटपसारा टाळून लेखने अगोदरच संक्षिप्त करून पाठविली तर ते उभयपक्षी सोयीचे जाणार आहे.

प्रस्तुत अंकासंबंधी थोडे लिहिणे औचित्याला धरून होईल असे वाटते. म. सा. पत्रिकेचे पूर्वीचे संपादक डॉ. हे. वि. इनामदार यांनी १९२८ ते १९७६ मार्च या काळातील पत्रिकेच्या संपादकांच्या कामगिरीचा परामर्श घेणारी लेखने यापूर्वीच्या अंकांतून प्रसिद्ध केलेली आहेत. एकंदर पंधरांपैकी बारा संपादकांच्या कामगिरीचे

अनुक्रमणिका

परामर्श घेणारे लेख आतापर्यंत प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांच्याच कारकीर्दीत त्यांनी स्वीकारून ठेवलेले व आपला संपादकीय हात फिरविलेले दोन लेख ('मालशे : एक कुशल' संपादक. ले. द. दि. पुंडे व 'म. सा. पत्रिका : माझे मनोगत.' भालचंद्र फडके) प्रस्तुतच्या अंकात प्रसिद्ध करीत आहोत. म्हणजे एकूण १४ संपादकांच्या कामगिरीचा परामर्श डॉ. इनामदार यांच्या कारकीर्दीत घेण्यात आला असे मानावे लागते. संपादक या नात्याने त्यांची ही कामगिरी उल्लेखनीय आहे. त्यांच्या इतर कामगिरीचा हिशेब त्यांनी स्वतःच यापूर्वीच्या (क्र. २०८) अंकात दिलेला आहे. याबद्दल आपण सर्व जणांनीच त्यांचे ऋण मान्य केले पाहिजे.

यापूर्वीचे पदाधिकारी आणि कार्यकारिणीचे सदस्य यांनी म. साहित्य परिषदेच्या कार्यात अनेक अंगांनी चैतन्य ओतण्याचा प्रयत्न केला. विविध उपक्रम आणि कार्यक्रम आयोजित करून 'परिषद' आधुनिक लेखक, समीक्षक, रसिक वाचक यांच्याशी संबंध कसा जोडू शकेल हे परोपरीने पाहिले. या बाबतीत त्यांच्या कार्याचा गौरव करावा तितका थोडाच आहे. त्याचे परिषदेवर आभारापलीकडचे ऋण आहे.

'आमचे नाना कुलकर्णी' (ले. ना. गो. चापेकर) हा लेख दि. १२ जून १९७९ रोजी येणाऱ्या कै. कृ. पां. कुलकर्णी यांच्या पुण्यतिथीनिमित्त प्रसिद्ध करीत आहोत. हा लेख कै. ना. गो. चापेकर यांनी १९६६ मध्येच लिहिलेला आहे. श्री. ना. गो. चापेकरही आता आपल्यातून निघून गेलेले आहेत. त्यांची पुण्यतिथी ६ मार्चला येते. हा लेख परिषदेच्या पूर्वीच्या फाईलमध्ये पाहण्यात आला. औचित्य साधून तो प्रस्तुतच्या अंकात देण्यात येत आहे.

प्रा. गो. म. कुलकर्णी यांचे प्रा. स. रा. गाडगीळ यांच्या प्रसिद्ध झालेल्या व्याख्यानावरील परीक्षण व प्रा. द. ता. भोसले यांचा 'ग्रामीण मराठी कथेतील विनोद व उपरोध' हा लेख हे मुद्दाम प्रस्तुतच्या अंकासाठी मागवून घेण्यात आलेले आहेत.

अशा रीतीने पूर्वीच्या संपादकांनी अगोदरच स्वीकारून व संस्कार करून ठेवलेले काही लेख आणि सध्याच्या संपादकांनी मागून घेतलेले एक-दोन लेख यांनी हा 'सीमेवरचा अंक' सजलेला आहे. इतर मजकूर परिषदेच्या कार्यवृत्ताचा आहे. आपण तो आवर्जून पाहावा ही विनंती.

— स्नेहांकित
संपादक, म. सा. पत्रिका

अनुक्रमणिका

# आमचे नाना कुलकर्णी

## ( कै. कृ. पां. कुलकर्णी )

लेखक : **ना. गो. चापेकर,** बदलापूर

---

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेची कचेरी मुंबईहून पुण्यास हलवावी असा ठराव परिषदेच्या हैदराबादच्या साहित्य-संमेलन-प्रसंगी ( १९३१ ) झाला, व त्याच वेळी परिषदेच्या कार्यकारी मंडळाची निवडणूक होऊन तीत परिषदेचा कार्याध्यक्ष म्हणून माझी त्यापूर्वीच नेमणूक कायम झाली, व प्रो. नाना कुलकर्णी हे परिषदेचे चिटणीस म्हणून नेमले गेले. त्या वेळेपासून नानांचे व माझे संबंध घनिष्ठ झाले. परंतु आमचा परस्पर परिचय त्यापूर्वीच झाला होता असे वाटते.

नानांच्या समग्र जीवनाचा व व्यक्तिमत्त्वाचा निकट परिचय त्यांनी आपल्या जीवनाच्या शेवटच्या कालखंडात प्रसिद्ध केलेल्या ' कृष्णाकाठची माती ' ( १९६१ ) या हार्दिकतेने तुडुंब भरून वाहणाऱ्या आत्मचरित्रपर ग्रंथावरून, अत्यंत स्नेहार्द्र वातावरणात होतो. विशेषतः नानांनी त्यात आपल्या परिचितांची जी हुबेहूब मूर्ति-चित्रे काढली आहेत ती, त्यांतील आपुलकीने व स्नेहार्द्रतेने, अत्यंत सरस उतरलेली आहेत. त्यात त्यांनी माझेही एक चित्र काढले आहे. या चित्रात व त्याच प्रकारच्या त्यांच्या इतरही चित्रात त्यांनी अनेकांची ओतप्रोत स्तुती केली आहे. त्या स्तुतीत अतिरंजकतेचा दोष असला तरी तीत त्यांचे गुणग्राहक आपुलकी व जिव्हाळा हे गुण ओतप्रोत भरून राहिले आहेत यात शंका नाही.

हैदराबादेच्या संमेलनप्रसंगीच नानांची म. सा. परिषदेचे चिटणीस म्हणून नेमणूक झाली, तरी परिषदेचे कार्यालय मुंबईहून पुण्यास हलविण्याबाबतच्या प्रश्नात पुढे मोठीच वादळे झाली. त्यात नानांना खूपच मनस्ताप सहन करावा लागला, आणि ते त्या बाबतीत फारच वैतागले होते. या प्रश्नाच्या बाबतीत मुंबईत भरलेल्या परिषदेच्या शेवटच्या साधारण सभेत ( २७-३-१९३२ ) तर त्यांच्या या वैतागाने उच्चांक गाठला, व ' परिषदेचे दफ्तर समुद्रात तरी फेकून द्या ' असे त्यांनी उद्गार काढले ! परंतु त्याच सभेत सर्व वादळ शमले, व परिषदेचे मुंबईहून पुण्यास ठरलेले

अनुक्रमणिका

स्थानांतर कायम झाले. या सर्व प्रकरणातील विधायक निर्णय कायम होण्याच्या बाबतीत कै. सरदार माधवराव किबे, श्री. गणपतराव जांभेकर, प्रो. न. र. फाटक प्रभृती मित्रांचे जसे बिनमोल साहाय्य झाले तसेच प्रो. नाना कुलकर्ण्यांचेही, माझे एक कार्यक्षम व विश्वासू चिटणीस म्हणून फार साहाय्य झाले. परिषदेच्या पुण्याच्या कचेरीचा पहिला पाया त्यांनीच घातला.

असेच त्यांचे विश्वासाचे व कार्यक्षम साहाय्य मला शुद्धलेखन समितीत शुद्ध-लेखनाचे नवीन नियम, जे गोव्याच्या संमेलनात ( १९३० ) मंजूर झाले ते, तयार करताना झाले. या नियमांचा स्थूल आराखडा मी तयार केला, परंतु त्यात व्याकर-णिक व व्युत्पत्तिक मालमसाला भरण्यात त्यांच्या भाषाविषयक व भाषाशास्त्रविषयक ज्ञानाचा मला फार उपयोग झाला.

म. सा. परिषदेचे चिटणीस म्हणून नानांचा व माझा जो घनिष्ठ संबंध आला, त्याची परिणती पुढे त्यांच्या-माझ्या निकटच्या ऋणानुबंधांत व स्नेहात झाली. परिषदेच्या निमित्ताने जी आम्ही काही मंडळी विशेषत्वाने एकमेकांजवळ आलो त्यांचेच एक ' बदलापूर मंडळ ' ( माझी मित्रमंडळी यासच ' चापेकर मंडळ ' असे अथवा कधी कधी ' येहोष मंडळ ' असेही म्हणतात ! ) बनले. ही मंडळी बदलापुरास माझे घरी माझ्या कै. मातुश्रींच्या वार्षिक श्राद्धप्रसंगी व इतरही प्रसंगविशेषांना नित्य येत असत. त्यात नाना कुलकर्णी हे नेहमी न चुकता हजर असत, व त्या वेळच्या चर्चा-मैफलींतून प्रामुख्याने भाग घेत असत. आमचे हे नित्याचे मित्रमंडळ व इतरही प्रासंगिक अतिथिमंडळे यांच्या बदलापुरास आमच्या माडीवरील दिवाण-खान्यात किंवा व्हराड्यात ज्या अगणित व बहुविध चर्चा होत असत त्याचे बौद्धिक आनंदाच्या स्वरूपाचे मोल मोजता येणार नाही. नानांनी या चर्चांतून केलेल्या भाषणांतून व काढलेल्या उद्‌गारांतून त्यांचे भाषिक, ऐतिहासिक, साहित्यिक, शैक्षणिक व सामाजिक विचारवंतांचे व्यक्तित्व उमटून दिसे व त्यांचे सौजन्य व जिव्हाळा प्रतीत होत असत. पुढे आमचे वार्षिक श्राद्धसमारंभाचे मेळाव्याचे स्वरूप बंद झाले. परंतु तरीसुद्धा माझी निकटची मित्रमंडळी वर्षातून एक दोन वेळा बदला-पुरी नियमाने येतच होती व अजूनही येतात. परंतु अलीकडे हे आमचे मित्रमंडळ पोतदार कुलकर्णी कर्वे-वाडेकर-पेंडसे-टिकेकर एवढेच मर्यादित राहिलेले होते, व त्यातही चिंतोपंत कर्वे आम्हांस सोडून गेले व अलीकडे नानाही त्यांच्या शेवटच्या आजारामुळे येऊ शकत नव्हते ! या मित्रमंडळातील लहानात लहान सभासदही आता साठीच्या पुढे गेलेले आहेत, व चिंतोपंतांच्या व नानांच्या दुःखद निर्वाणाने त्यासही गळतीस प्रारंभ झालेला आहे. आम्हीही राहिलेली मंडळी जमतो, तेव्हा चिंतोपंतांचे व नानांचे आम्हांस स्मरण होऊन आम्ही फार कष्टी होतो. नानांचा स्नेह म्हणजे माझ्या जीवनातील एक अत्यंत मोलाचा ठेवा होय. ही जाणीव माझ्या मनात सदैव जागृत

अनुक्रमणिका

असते. मला परम दुःखाची व शोकाची गोष्ट एवढीच की वयाने माझ्याहून खूपच लहान असून नाना माझ्याआधी निघून गेले ! परंतु इलाज काय ?

नानांच्या प्रसिद्ध व अप्रसिद्ध ग्रंथांची केवळ यादी पाहिल्यास विस्तृत विद्वत्ता व जबरदस्त उद्योगशीलता या त्यांच्या गुणांची ओळख तावडतोब पटते. ते मूळचे संस्कृत विषयातील नामवंत पदवीधर, ग्रंथकार, प्राध्यापक होते. परंतु आपल्या स्वतःच्या जबरदस्त उद्योगाने ते मराठी भाषा, भाषाशास्त्र व साहित्य आणि मराठ्यांचा इतिहास याही विषयांत ते एक पट्टीचे व मान्यवर विद्वान व कोशकार झाले. प्रारंभीच्या काही अल्प काळात ते प्राध्यापक होते, परंतु ते पुढे पुष्कळ वर्षे हायस्कुलात शिक्षक म्हणूनच होते. याच काळात त्यांनी निष्ठा व उद्योग यांचा आश्रय करून आपले ग्रंथलेखन केले; आणि केवळ याच ग्रंथलेखनाच्या शिदोरीवर त्यांनी आपल्या जीवनातील एक महत्त्वाचा विजय मिळवला ! कै. बाळ गंगाधर खेर, मुंबई राज्याचे माजी शिक्षणमंत्री, यांनी मुंबईच्या सरकारी एल्फिन्स्टन महाविद्यालयातील मराठीच्या ज्येष्ठ प्राध्यापकपदावर एक विशिष्ट नेमणूक करण्याचा निर्णय ठरविल्याचे कानावर आल्यानंतर, नानांनी त्यांची खासगी रीतीने मुद्दाम भेट घेतली, व आपण केलेली मराठी भाषा, साहित्य व इतिहास यांची सेवा नम्रपणे त्यांचे नजरेस आणली. त्या वेळी ‘ तुम्ही आपल्या विषयात एवढे काम केलेले मला नीटसे माहीत नव्हते – पण मी आता माझा पूर्वीचा निर्णय बदलून त्या प्राध्यापकपदी तुमचीच नेमणूक करतो ’ असे कै. बाळासाहेबांनी त्यांना प्रांजलपणे आश्वासन दिले व त्याप्रमाणे कार्यवाही केली ! या नेमणुकीची हकीकत त्यांनी नंतर आम्हा मित्रमंडळींस सांगितली, तेव्हा आम्हांस फार आनंद झाला ! ही त्यांची नेमणूक म्हणजे त्यांनी जीवनात मिळविलेला एक अत्युच्च विजय होय !

नानांच्या भाषिक, भाषाशास्त्रीय व कोशरचनेच्या उद्योगाची स्फूर्ती त्यांनी कै. विसुभाऊ राजवाडे यांच्यापासून घेतली होती. त्यातूनच त्यांनी राजवाड्यांच्या कोशाचे संपादन व प्रकाशन मोठ्या आस्थेने केले, व त्यांनी स्वतःच्या ‘ मराठी व्युत्पत्तिकोश ’ची रचनाही केली. त्यांच्या भाषाशास्त्रीय व व्याकरणशास्त्रीय उद्योगाची परिणतीही त्यातूनच झाली असे म्हणता येईल. त्यांच्या या अभ्यासात व संशोधनात साक्षेप, बारकावा व बिनचूकपणा हे गुण असावे तेवढ्या प्रमाणात नव्हते असे तज्ज्ञ विद्वज्जनांचे मत टीकेच्या रूपाने व्यक्तही होई, व त्यामुळे ते कधी कधी अस्वस्थ व संतप्तही होत असत हे खरे. परंतु अशा प्रकारच्या कार्यात अक्षराअक्षरागणिक चुका होण्याची शक्यता असते ही गोष्ट लक्षात घेता, त्यांचे कुठेकुठे कमी पडले, यापेक्षा त्यांनी कुठेकुठे नवीन प्रकाश पाडला यावर भर देणे अधिक युक्त होईल असे मला वाटते. विशेषतः कोशरचनेच्या कामात प्रमाद अजिबात न झालेले कोशकार विरळा ! झालेल्या चुका प्रांजलपणे मान्य करून त्या दुरुस्त

करण्याची तत्परता ठेवणे हेच कोशकाराचे कर्तव्य! नानांनी आपल्या मराठी व्युत्पत्ति-कोशाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या वेळी त्याच्या पहिल्या आवृत्तीचा कसून अभ्यास करणाऱ्या विद्वानांकडून त्यांचे त्याबाबतचे परिशुद्ध साहित्य मिळवून त्याच्या साहाय्याने आपल्या कोशात नानांनी ज्या सुधारणा केल्या, त्यातच त्यांची जातिवंत व शास्त्रनिष्ठ विद्वानाची भूमिका व्यक्त होते.

पेशवे दफ्तरात रियासतकार कै. गोविंदराव सरदेसाई यांच्या हाताखाली पेशवाई-कालीन ऐतिहासिक साहित्याचा अभ्यास करण्याची नानांस जी अमोल संधी मिळाली, तिचा त्यांनी फार आस्थेने उपयोग करून घेतला. या अभ्यासाने त्यांचे मराठ्यांच्या इतिहासाचे ज्ञान फार विस्तृत व तपशिलाने संपन्न असे झाले यात शंका नाही. या त्यांच्या ज्ञानास लेखनिविष्ट स्वरूप भरपूर प्रमाणात मिळू शकले नाही ही खेदाची गोष्ट होय. परंतु त्यांनी ऐतिहासिक विषयावर जी असंख्य व्याख्याने दिली, त्यातून त्यांनी या आपल्या ज्ञानाचा भरपूर फायदा आपल्या श्रोत्यांस दिला. ऐतिहासिक अथवा इतर कुठल्याही हकिकती व्याख्यानांतून किंवा संभाषणांतून सांगताना त्या हकिकती प्रत्यक्षपणे आपल्या डोळ्यांसमोर घडताहेत असे श्रोत्यांस वाटावे, अशी नानांची निवेदनशैली असे. कालेगावच्या रानातील तंबाखूच शाहू छत्रपतींस कसा विशेष आवडत असे, अथवा ग्वाल्हेरीकडील एका मुक्कामी पोचल्याबरोबर बाजीराव-साहेबांनी ' कोंबडी कोठे आहे – कोंबडीचे प्रयोजन आहे ' अशी जी चौकशी केली तिचे वृत्त त्या मुक्कामावरील वार्ताहराने तातडतोब चिमाजी अप्पास कसे कळविले व त्यामुळे इकडे पुण्यास काय झाले – इत्यादी गोष्टी अत्यंत मूर्त स्वरूपात मनोरम रीतीने रंगवून, परंतु कागदपत्राच्या आधारे व इतिहास न सोडता, श्रोत्यांस सांगण्यात नानांचा हातखंडा असे! त्यांनी इतिहासात भरपूर लेखन करावयास हवे होते, व ते राहून गेले ही खेदाची गोष्ट होय यात शंका नाही.

नानांचे वैयक्तिक जीवन सुखदुःखांनी मिश्र असे होऊन गेले. एकंदरीत प्रतिकूल परिस्थितीत व गरिबीत निष्ठेने व चिकाटीने त्यांनी विद्याभ्यास केला व नंतर सरकारी शिक्षणखात्यात नोकरी मिळविली. लहानपणापासून भोवतालच्या आप्तगणांनी मनात उत्पन्न केलेल्या आकांक्षेप्रमाणे ईप्सित वधूशी त्यांचा विवाह झाला व त्यांनी आपल्या कन्या-पुत्रांना जन्म दिला. त्यांनी एकनिष्ठेने व अत्यंत प्रेमपूर्ण रीतीने संसार केला. परंतु ऐन मध्यान्ही त्यांची प्रिय पत्नी सौ. मनूताई या त्यांना व त्यांच्या लहान लहान अर्भकांना शोकसागरात सोडून परलोकी गेल्या. हे त्यांना अपार दुःख झाले! पुढे त्यांनी पुण्यास जो आपला बंगला बांधला त्यास आपल्या प्रिय पत्नीच्या स्मरणार्थ ' मनु-स्मृति ' असे नाव दिले. परंतु नानांचे नैतिक व नैष्ठिक मोठेपण हे की आपल्या लहान व असहाय अर्भकांकडे पाहून, द्वितीय विवाह करण्याचे त्यांचे वय गेले नसतानासुद्धा त्यांनी तो विचार मनात आणला नाही! अपत्यांचे संगोपन

व त्यांस त्यांच्या जीवनमार्गावर सुस्थिर करणे या एवढ्या एकाच ध्येयासाठी त्यांनी खडतर एकाकी जीवनाचा अंगीकार केला! या व्रतस्थ तपश्चर्येच्या मार्गानून, भोवतालच्या मित्रांकडून मिळणाऱ्या सूचनांना व प्रलोभनांना बळी न पडता, ते कधीही विचलित झाले नाहीत! या त्यांच्या जीवनात त्यांच्या कै. सासूबाईंची (त्यांची मामी) त्यांजवरील मातृप्रेमाची पाखर त्यांना फार उपयोगी पडली. मुलेही फार चांगली निघाली व सुनाही फार चांगल्या मिळाल्या, मुलींची लग्ने चांगली झाली. परंतु त्यातही दोन मुलींच्या मृत्यूचे दारुण दुःख त्यांस सहन करावे लागले! दुसऱ्या मुलीच्या अपघाती निर्याणानंतरच त्यांनी 'कृष्णाकाठची माती' हा मनोरम आत्मचरित्र ग्रंथ मनास केवळ विरंगुळा म्हणून लिहिला! जीवन हे अनेकांस अनेक प्रकारची दर्शने देते. नानांस त्याचे दर्शन मिश्रस्वरूपात झाले व त्यात दुःखाचा भाग बिलकूल कमी नव्हता हे खरे, पण नानांनी कधीही धीर टाकला नाही व ते आपली प्राप्त कर्तव्ये नीटपणे करीतच राहिले! शेवटी शेवटी त्यांना आपण आपली जीवनकर्तव्ये नीटपणे पार पाडली आहेत असे समाधानही वाटून ते कृतार्थ जीवनच अनुभवीत होते व त्यातच त्यांना बोलावणे आले!

नानांचे घराबाहेरील सार्वजनिक जीवन मात्र बहुतेक सर्वस्वी यशस्वी व मान-सन्मानांनी परिपूर्ण असे झाले. नोकरीतील परिस्थितीने केवळ शालेय अध्यापकाच्या दर्जापासून ते सरकारी महाविद्यालयांतील प्रमुख महाविद्यालयात आपल्या विषयाच्या प्रमुख प्राध्यापकपदापर्यंत केवळ स्वतःच्या कर्तबगारीने ते चढले. या कर्तबगारीतील ग्रंथकर्तृत्वामुळे ते अनेक किरकोळ सभा-संमेलनांचे अध्यक्ष तर झालेच, पण शारदोपासक संमेलन, नागपूर संशोधन मंडळ संमेलन, मराठी साहित्य संमेलन इत्यादी अखिल महाराष्ट्रीय महत्त्वाच्या संमेलनांचेही ते अध्यक्ष झाले. मुंबईच्या मराठी संशोधन मंदिराचे ते पहिले संचालक झाले, तसेच ते नारायण टोपीवाला कॉलेजचे पहिले प्रिन्सिपलही झाले. शेवटी स्वातंत्र्यकाळात ते महाराष्ट्र शासनाच्या भाषा सल्लागार मंडळाचे पहिले अध्यक्षही झाले व जीवनाच्या अखेरपर्यंत ते त्या पदावर होते. त्यांच्या उद्योगाचे व विद्वत्तेचे जनतेने व शासनाने चीज केले!

परमेश्वर आमच्या या जिव्हाळ्याच्या मित्राच्या आत्म्यास चिरशांती देईलच!

अनुक्रमणिका

# मालशे : एक कुशल संपादक

**दत्तात्रय दिनकर पुंडे**

डॉ. स. गं. मालशे यांनी एप्रिल १९७० ते मार्च १९७३ या काळात म. सा. पत्रिकेचे संपादक म्हणून काम पाहिले. त्यांच्या साहाय्यार्थ असलेल्या संपादन-समितीत अशोक केळकर, म. ना. अदवंत, द. मा. मिरासदार, शंकर सारडा आणि भीमराव कुलकर्णी हे सदस्य होते. मालशे यांनी या समितीच्या साहाय्याने अंक क्र. १७३ (एप्रिल-मे-जून १९७०) ते क्र. १८४ (जाने.-फेब्रु.-मार्च १९७३) अशा बारा अंकांचे संपादन केले. त्यांपैकी अंक क्र. १७६-१७७ हा एकच जोडअंक होता. मालशे यांच्या संपादकीय कारकीर्दीत पत्रिकेचे सर्व अंक वेळेवर प्रकाशित झाले.

## पत्रिका 'देखणी' झाली

मालशे यांनी पत्रिकेचा सर्वार्थाने कायापालट केलेला दिसतो. पत्रिकेच्या अंतरंग-बदलाबरोबरच त्यांनी तिचे बाह्यांगही बदलले. पत्रिकेचा पूर्वीचा आकार बदलून मालशे यांनी ती डबल डेमी आकारात काढायला सुरुवात केली. या बदलाचे दृश्य-फल म्हणजे पत्रिकेत प्रसिद्ध झालेल्या काही मजकुरांच्या पुस्तिका महाराष्ट्र साहित्य परिषदेस प्रकाशने म्हणून लाभल्या. उदाहरणार्थ इरावती कर्वे यांच्या 'महाराष्ट्र : एक अभ्यास' या पत्रिकेतील दोन लेखांची वेगळी पुस्तिका म. सा. परिषद प्रकाशित करू शकली.

मालशे यांनी संपादित केलेल्या पहिल्या अंकावर (एप्रिल-मे-जून १९७०) चित्रकार अवचट यांचे मुखपृष्ठ आहे. यानंतरच्या प्रत्येक अंकाचे मुखपृष्ठ वेगळे आणि वैचित्र्यपूर्ण ठेवण्याचा प्रयत्न मालशे यांनी केलेला आहे. जन्मशताब्दीच्या निमित्तांनी संबंधित अंकावर श्री. कृ. कोल्हटकर आणि वि. ल. भावे यांची छायाचित्रे, न. चिं. केळकर आणि कवी विनायक यांची रेखाचित्रे आणि कृ. प्र. खाडिलकर यांचे तीन रंगी चित्र छापून औचित्य साधले आहे. अंकाचा शक्य तितका चांगला 'ले-आउट' करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. अंकाचे मुद्रित-शोधन जास्तीत जास्त अचूक केलेले दिसते. ज्या बारीक-सारीक चुका राहिल्या

( असे क्वचित घडले ) त्याची शुद्धिपत्रे त्याच अंकात किंवा नंतरच्या अंकात न चुकता छापली.

## भरगच्च वाचनीय मजकूर दिला.

पत्रिकेच्या मजकुराच्या दृष्टीनेही मालशे चिकित्सक राहिलेले दिसतात. पत्रिकेत समीक्षात्मक आणि संशोधनात्मक मजकूर द्यायचा प्रयत्न त्यांनी केलेला आहे.

मालशे यांची संपादकीये म्हणजे महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जगातील फेरफटकाच. साहित्य, कला, संस्कृती इ. क्षेत्रांत तीन महिन्यांच्या कालावधीत ज्या महत्त्वपूर्ण घटना घडल्या त्यांचे पडसाद मालशे यांच्या संपादकीयांत उमटलेले दिसतात. अशा घटनांची केवळ नोंद घेऊन न थांबता मालशे त्यांवर भाष्यही करतात.

मालशे यांनी आपल्या संपादकीयांतून साहित्य-विचारांना चालना देणारे नव-नवीन मुद्दे उपस्थित केलेले आहेत. 'जन्मशताब्दीच्या सोहळ्यांच्या निमित्ताने' ( पत्रिका, ऑक्टो.–नोव्हें.–डिसेंबर १९७० ) 'सारस्वताची गळचेपी' ( पत्रिका, ऑक्टो.–नोव्हें.–डिसेंबर १९७१ ) इ. 'स्फुटे' पाहण्यासारखी आहेत.

मालशे यांच्या लेखणीचे विविध विभ्रम त्यांच्या संपादकीयांत पाहण्यास मिळतात. एकूण मालशे यांनी संपादकीय मजकूर वाचनीय, मननीय केला व त्याद्वारे साहित्य-विचारांना चालना देण्याचा प्रयत्न केला.

त्यांनी पत्रिकेचे सर्व अंक एका शिस्तीने आणि पूर्व-नियोजन करून काढलेले दिसतात. एकूण ११ अंकांपैकी ( १० नियत अंक व एक जोड अंक ) ३ विशेषांक व ३ वाङ्मय-समालोचन अंक आहेत. इतर अंकांचे मूल्यही विशेषांकांइतकेच आहे. हे हर्क्युलस पद्धतीचे प्रचंड कार्य मालशे करू शकले ते त्यांच्या साहित्यप्रेमामुळे आणि सर्वसंग्राहकवृत्तीमुळे. अधिकारी व्यक्तींना पुनःपुन्हा भेटून, स्मरणपत्रे पाठवून मोठ्या चिकाटीने त्यांनी लेख मिळवलेले आहेत. भिन्न प्रकृतीचे लेखक आणि विविध विषयांवरील लेख यामुळे पत्रिका एकसुरी न राहता अनेकरंगी झाली.

## वैशिष्ट्यपूर्ण विशेषांक

मालशे संपादक असतानाच्या कालावधीत थोर वाङ्मय-सेवकांच्या जन्मशताब्दीचे सोहळे झाले. या सोहळ्यांचाच एक भाग म्हणून मालशे यांनी कोल्हटकर–विशेषांक ( जुलै–ऑगस्ट–सप्टेंबर १९७१ ), खाडिलकर-विशेषांक ( ऑक्टो.–नोव्हें.–डिसेंबर १९७१ ) आणि केळकर-विशेषांक ( जुलै–ऑगस्ट–सप्टेंबर १९७२ ) असे तीन विशेषांक काढले. या विशेषांकांतून या थोर साहित्यिकांच्या वाङ्मयीन व्यक्तित्वाचा शोध घेण्यात आलेला आहे. या सर्व विशेषांकांच्या प्रकाशनामागे मालशे यांचे काही पूर्वनियोजन होते हेही लक्षात येते.

कोल्हटकर-विशेषांकातील विनोदावरील लेखाची अनुपस्थिती संपादकीय मजकुरात त्यांनी भरून काढली. कोल्हटकरांच्या वाङ्मयाच्या समालोचनाबरोबरच 'कोल्हटकरांचे ज्योतिषविषयक कार्य', 'कोल्हटकरांचे व्यक्तिमत्व', 'श्रीपाद कृष्णांचा वाङ्मयव्यासंग' यांसारखे लेख या अंकाकरिता मालशे यांनी मिळविले आहेत.

खाडिलकर-विशेषांक लक्षणीय झाला तो त्यातील मजकुराच्या विविधतेमुळे. भिडे गुरुजी व पुंडलीकजी कातगडे यांनी दिलेल्या आठवणी, वा. कृ. दातार या जुन्या नाट्यसेवकाची आत्मपर टिपणे आणि 'विद्याहरणा'तील रूपक उलगडून दाखविणाऱ्या गणेशोत्सवातील एका मेळ्यातील पद्यावलीचे पुनर्मुद्रण यामुळे हा अंक एकदम 'अनोखा' झाला आहे. या अंकाचे जवळजवळ सर्वच लेखक (वि. स. खांडेकर, ना. सी. फडके, व. शां. देसाई, अ. ज. करंदीकर, न. र. फाटक, ल. ना. गोखले, इ.) हे प्रथितयश लेखक टीकाकार आहेत.

केळकर-विशेषांकातही लेखक व लेख यांची विविधता आहे. सात व्यक्तींच्या 'आठवणी' आणि के. नारायण काळे यांचा एक लेख यातून केळकरांचे व्यक्तिचित्र साकार होते. श्री. शं. नवरे यांचा 'संपादक केळकर', त्र्यं. वि. पर्वते यांचा 'राजकारणी' केळकर आणि 'दुर्दम्य'कार गंगाधर गाडगीळ यांचा 'टिळक-चरित्रकार केळकर' या लेखांमागील मालशे यांची योजना लक्षात घ्यावी.

## पत्रिका : खुले चर्चापीठ

मालशे यांनी पत्रिकेच्या लेखकांना जसे पूर्ण स्वातंत्र्य दिले तसेच पत्रिकेच्या वाचकांनाही दिलेले आहे, ही गोष्ट पत्रिकेत प्रसिद्ध झालेल्या 'टीपा-टिप्पणी' आणि 'पत्रव्यवहार' यावरून स्पष्टपणे लक्षात येते. पत्रिकेच्या अनेक साक्षेपी वाचकांनी पत्रिकेत प्रसिद्ध झालेल्या मजकुरावर चालना देणाऱ्या, विचारांशी मतभेद व्यक्त करणाऱ्या, तपशील चुकीचा असल्याबाबत नोंद करणाऱ्या लेखांबाबत संपादकांवर अंकुश ठेवू पाहणाऱ्या प्रतिक्रिया व्यक्त केल्या.

महत्त्वाचे म्हणजे वरील प्रकारच्या प्रतिक्रियांतून न. र. फाटक, दत्तो वामन पोतदार, ना. सी. फडके यांच्यासारखे जुनेजाणिते जसे सुटले नाहीत तसेच खुद्द पत्रिकेचे संपादक आणि संपादन समितीचे सदस्यही सुटले नाहीत. याचा अर्थ इतकाच की, पत्रिकेतील मजकुरावर प्रतिक्रिया देण्याबाबत मालशे यांनी वाचकांना निर्भय बनविले असाच होतो. प्रश्न असा आहे की वाचक असे निर्भय झाले ते कशामुळे? याचे उत्तर म. सा. पत्रिका जुलै–ऑगस्ट–सप्टेंबर १९७० च्या अंकात सापडते. आपल्या 'शोधनिबंधाची लेखनपद्धती' (म. सा. पत्रिका, एप्रिल–मे–जून १९७०)

या निबंधावर अशोक रा. केळकर यांनी लिहिलेली टीका-टिप्पणी मालशे यांनी छापली आहे.

म. ना. अदवंत हे पत्रिकेच्या संपादन-समितीचे सदस्य होते. त्यांच्या 'दिवाकर कृष्णांची कथा' या लेखावर (पत्रिका, एप्रिल-मे-जून १९७०) आलेल्या सुरेश जोशी आणि प्र. ना. परांजपे यांच्या काहीसे असमाधान व्यक्त करणाऱ्या प्रतिक्रियांनाही मालशे यांनी प्रसिद्धी दिली.

कै. ल. रा. पांगारकरांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने त्यांच्या व्यक्तित्वाचा शोध घेणारे दत्तो वामन पोतदार आणि न. र. फाटक या दोघांचे वादग्रस्त (!) लेख पत्रिकेच्या एप्रिल-मे-जून १९७२ च्या अंकात आलेले आहेत. त्यावरील श्री. शं. नवरे यांची प्रतिक्रिया जुलै-सप्टेंबर १९७२ च्या अंकात छापली आहे. पोतदार-फाटकांचे लेख "कमी-अधिक प्रमाणात औचित्यभंग करणारे आहेत" असे तर नवरे लिहितातच, पण "... संपादकाने आपला तारतम्याचा हक्क बजावण्यास काही हरकत नव्हती" असेही मत परखडपणे नोंदवितात.

प्र. रा. दामले यांनाही पांगारकरांविषयीचे लेख खटकले. त्यांना केळकर-विशेषांकातील (पत्रिका, जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९७२) चिंतामणराव कोल्हटकरांची मोठ्या टाइपात पुनर्मुद्रित केलेली आठवणही खटकली. दामले यांचे संपूर्ण पत्र मुळातून पाहण्यासारखे आहे. पत्रात शेवटी ते लिहितात, "आठवण clever म्हणून द्यायची तर ती इतक्या प्रामुख्याने देण्याचे काही कारण नव्हते."

संपादकावर अंकुश ठेवू पाहणाऱ्या पण प्रामाणिक वाचक-प्रतिक्रियांचा मालशे कसा आदर करतात हे वरील उदाहरणांवरून लक्षात यावे. संपादकाला आलेली (!) 'खुषीपत्रे' छापण्याच्या जमान्यात राहूनही मालशे यांनी अशी पत्रे छापली. वास्तविक पत्रिकेचा अंतर्बाह्य कायापालट केल्याने त्यांच्यावर अभिनंदनपत्रांचा वर्षाव झाला होता. पण मालशे यांनी तसले एकही पत्र छापले नाही.

ना. सी. फडके यांच्या 'कवि कृष्णाचा पद्यविलास' या लेखातील (पत्रिका, ऑक्टो.-नोव्हें.-डिसेंबर १९७२) एक गंभीर चूक दाखविणारे अ. म. जोशी यांचे पत्र किंवा पत्रिकेच्या एप्रिल मे-जून १९७२ च्या अंकातील पृ. ७८ व ८७ वरील एका कवितासंग्रहाचा उल्लेख चुकीचा असल्याचे निदर्शनास आणणारे मनीषा दीक्षित यांचे पत्र, यांसारखी पत्रे छापून मालशे वाचकापर्यंत अचूक तपशील पोहचविण्याची दक्षता घेतात.

'टीका – टिप्पणी' या सदराबाबतही मालशे वाचक-लेखकांना पूर्ण स्वातंत्र्य देतात. पत्रिकेच्या अंकात सातत्याने आलेली 'हिती-अहिती : ज्ञानेश्वरी पाठचर्चा' या संदर्भात पाहावी. श्री. ना. बनहट्टी, शं. दा. पेंडसे, रा. श्री. जोग, म. अ. मेहेंदळे, मधुकर रा. जोशी, वि. म. कुलकर्णी, अशा जाणकारांनी या चर्चेत आपापला पक्ष

मांडला. तरीही चर्चा संपेना. शेवटी सर्वांना पुन्हा आपली मते मांडण्याची संधी देऊन मालशे यांनी डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या करवी चर्चेचा समारोप घडवून आणला ( पत्रिका, जाने.-जून १९७१ ).

पत्रिकेत प्रसिद्ध झालेल्या काही टिप्पणींतून चर्चेची अपेक्षा होती. आणि चर्चा होऊन ही अपेक्षा परिपूर्ण झाल्याचे दिसते ( उदा. अ. म. जोशींची 'हे लेखन शुद्ध की अशुद्ध' ही टिप्पणी ) काही टिप्पणी पत्रिकेत प्रसिद्ध झालेल्या लेखांचा पाठपुरावा करणाऱ्या आहेत. पत्रिकेत पूर्णतः स्वतंत्र अशी टिपणेही प्रसिद्ध झालेली आहेत.

## संशोधक मालशे यांचे संपादक मालशांना साहाय्य

पत्रिकेत आलेल्या संशोधनपर मजकुराचे स्वरूप खालीलप्रमाणे दिसते.

( १ ) संशोधनक्षेत्रात नव्याने पदार्पण करणाऱ्या अभ्यासकांना किंवा विद्यापीठीय पातळीवर प्रबंधलेखन करू इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शक ठरेल अशी माहिती देणारा 'शोधनिबंधाची पद्धती' हा मालशे यांचा दीर्घ निबंध एप्रिल–मे–जून १९७० च्या अंकात प्रसिद्ध झालेला आहे. या निबंधाचे महत्त्व स्वयंसिद्ध आहे.

( २ ) गो. चि. भाटे, शं. रा. तथा आहिताग्नि राजवाडे आणि शं. रा. हातवळणे या तीन विद्वानांच्या व वा. कृ. दातार या नटवर्यांच्या अप्रकाशित आत्मचरित्रातील वेधक भाग मालशे यांनी पत्रिकेत प्रसिद्ध केलेला आहे.

( ३ ) मालशे यांच्या कारकीर्दीत संशोधनपर लेख हे पत्रिकेचे भूषण झालेले दिसते. त्यांच्या कारकीर्दीत पत्रिकेत दहापेक्षा अधिक महत्त्वपूर्ण संशोधनपर लेख प्रसिद्ध झालेले आहेत. धोंडांचा 'आनंदवनभुवनी' या लेख संशोधनात नवी दृष्टी देणारा आहे. भीमराव कुलकर्णी यांचा ऐतिहासिक नाटक शताब्दी निमित्ताने लिहिलेला 'झांशीवालीचे नाट्यावतार' हा लेख एकाच वेळी संशोधन व समीक्षा यांचा एकात्म आविष्कार घडवितो. रा. चिं. ढेरे यांचा 'श्रीमुक्तादेवी योगिनी : आणखी काही माहिती', गंगाधर मोरजे यांचा 'खिस्ती मिशनऱ्यांच्या दोन लावण्या', म. रा. जोशींचा 'एकनाथस्वामी मठ व ज्ञानदेवीच्या चार प्रती', मालशे यांचे 'तेलंगकृत संगीत हजामत' आणि 'केशवकुमारांची अनुपलब्ध विडंबने' या लेखांत संशोधनास आवश्यक असणारी अचूकता व शिस्त आहे. रा. शं. वाळिंबे यांचा 'एकच प्याला नाटकाची जन्मकथा' हा लेख त्यांच्या व्यासंगाची कल्पना देतो.

( ४ ) ना. ह. आपटे यांचा व्यक्तिगत पत्रव्यवहार आणि खुपेरकर-केळकर या दोन संशोधकांतील पत्रव्यवहार पत्रिकेत प्रकाशित केलेला आहे. व्यक्तिगत आणि संशोधनपर अशा दोन्ही प्रकारचे पत्रव्यवहार मालशे यांनी वाचकांना अधिक चिकित्सेसाठी उपलब्ध करून दिले.

( ५ ) 'भूतवेध' हे नवे गमतीचे आणि आकर्षक सदर मालशे यांनी पत्रिकेत सुरू केले. 'प्रभाकरा'चे संपादक भाऊ महाजन म्हणजे सुधारणेची नजर असलेले गेल्या शतकातील व्यक्तित्व. त्यांचे लेख ग्रंथरूपाने उपलब्ध नसल्याने सुधारणावादात त्यांचे नाव दुर्लक्षित राहिल्यासारखे दिसते. 'प्रभाकरा'तील निवडक उतारे पत्रिकेत पुनर्मुद्रित करून मालशे एक प्रकारे भाऊ महाजनांना जणू न्यायच देत आहेत.

## भाषणांतील विचारधनाचे जतन

विविध प्रसंग, समारंभ, उत्सव इ. च्या निमित्ताने ठिकठिकाणी अनेक अधिकारी व्यक्तींची महत्त्वपूर्ण विषयावर व्याख्याने होत असतात. अशी व्याख्याने लेखनबद्ध झाली नाहीत तर त्यातील महत्त्वपूर्ण साहित्यविचार अक्षरशः वाऱ्यावर विरून जाण्याची शक्यता असते. त्यांना अक्षररूप देणे हे एक आवश्यक कार्य असते. मालशे यांनी अशी व्याख्याने पत्रिकेत छापली.

केवळ व्याख्यात्यांची नावे आणि व्याख्यान-विषय यावर ओझरता दृष्टिक्षेप टाकला तरी ही व्याख्याने लेखरूपाने पत्रिकेत छापण्यात मालशे यांनी सारस्वताची किती महत्त्वपूर्ण सेवा केली आहे हे लक्षात येते.

## भाषाभगिनींचा संसार

'भारतीय भाषांतील श्रेष्ठ प्रतीच्या स्फुट साहित्याचा परिचय करून देणे' ह्या हेतूने पत्रिकेच्या ऑक्टो.-नोव्हे.-डिसेंबर १९७० च्या अंकापासून 'भाषाभगिनींच्या संसारातून' हे सदर मालशे यांनी सुरू केले. पण फक्त चारच अंकांत हे सदर आलेले दिसते. हे सदर सातत्याने चालले नाही हे वाचकांचे दुर्दैव होय. मात्र मालशे यांना पत्रिकेत असे सदर असण्याची आवश्यकता वाटत होती याची नोंद घेण्यासारखी आहे.

स्वतः मालशे यांचा भाषाशास्त्राचा चांगला व्यासंग आहे. संपादन समितीतील एक सदस्य अशोक केळकर हे आधुनिक भाषाविज्ञानाचे चिकित्सक अभ्यासक तर दुसरे भीमराव कुलकर्णी हे भाषाशास्त्राचे सातत्याने अध्यापन केलेले प्राध्यापक. देविसिंग चौहान, म. अ. मेहेंदळे, ना. ग. जोशी, अशोक केळकर, वेंकटेशशास्त्री जोशी इ. विद्वानांचे विविध भाषाशास्त्रीय प्रश्नावरील लेख पत्रिकेत आले आहेत. मेहेंदळे यांचा 'भाषाशास्त्राची वाटचाल' ( पत्रिका, जाने.-फेब्रु.-मार्च १९७२ ) आणि जोशींचा 'साहित्य-समीक्षा आणि 'भाषाविज्ञान' ( पत्रिका, जाने.-फेब्रु.-मार्च १९७३ ) हे लेख लक्षणीय होत. कोल्हटकर विशेषांकातील अशोक केळकर यांचा कोल्हटकरांच्या भाषाविचारावरील लेख खास उल्लेखनीय आहे.

## शब्दवेध : एक वेधक सदर

एप्रिल-मे-जून १९७० ते ऑक्टो.-नोव्हें.-डिसेंबर १९७१ आणि जाने.-फेब्रु.-मार्च १९७३ अशा ७ अंकांतून 'शब्दवेध' या सदरात एकूण २० टिपणे आलेली आहेत.

शब्दवेध हे सदरही चर्चेकरिता खुले ठेवले होते. या सदराने मराठीच्या अर्थ-प्रक्रियेतील अलक्षित स्थित्यंतराकडे वाचकांचे लक्ष वेधून घेतले.

## पुस्तक-परीक्षणे

मालशे-संपादित पत्रिकेत एकूण ५५ पुस्तक-परीक्षणे आलेली असून त्यांची व्याप्ती २६३ पृष्ठे इतकी आहे.

मालशे यांनी पत्रिका देखणी केली व वाचनीयही केली. उभ्या महाराष्ट्रातून लेखक-वर्ग गोळा केला. पत्रिका हे साहित्य-चर्चेचे खुले व्यासपीठ केले. साहित्य-विचारांना चालना देण्याकरिता ते सतत प्रयत्नशील राहिले. त्यांनी वाचकांना निर्भय बनविले आणि लेखक आणि वाचक यांचा पत्रिकेमार्फत दुवा साधला. संशोधन, भाषाविज्ञान इ. साहित्य-विचारांना पोषक शाखेचे दरवाजे खुले केले.

■

---

## नवे आजीव सभासद

(एप्रिल व मे १९७९)

पुणे : १. श्री. मधुकर गणेश रानडे
२. प्रा. चिंतामणी शंकर इनामदार
३. श्री. अरुण विष्णु दीक्षित
४. डॉ. केशव वि. पानसे
५. श्री. अशोक यशवंत अत्रे
६. सौ. आशा सुरेश देशपांडे

परगावचे : १. सौ. रेखा रमेश नावंकर, मुंबई
२. श्री. श्रीरंगराव कृ. भोसले, कोल्हापूर
३. प्रा. मधुकर द. हातकणंगलेकर, सांगली
४. डॉ. गो. मा. पवार, कोल्हापूर
५. डॉ. अशोक केशव काळे, अमेरिका
६. श्री. द. रा. पेंडसे, मुंबई

# म. सा. पत्रिका — माझे मनोगत

भालचंद्र फडके

---

महाराष्ट्र-साहित्य परिषदेच्या 'साहित्य-पत्रिके'च्या संपादनाची जबाबदारी मी स्वीकारावी अशी डॉ. रा. शं वाळिंबे यांची इच्छा होती. त्यांच्या इच्छेला मान द्यावा आणि 'पत्रिके'ला वेगळे वाङ्मयीन रूप द्यायचा प्रयत्न करून पाहावा म्हणून एप्रिल १९७३ ते मार्च १९७६ पर्यंत 'पत्रिके'चे संपादनकार्य शिरावर घेतले. सल्ला-मसलत करण्यासाठी गंगाधर गाडगीळ, व्यंकटेश माडगूळकर यांसारखे प्रतिष्ठित लेखक, प्रा. रमेश तेंडुलकर, प्रा. कृ. ब. निकुम्ब, डॉ. वा. वा. दातार यांसारखे जाणकार समीक्षक, चांगल्या साहित्याची पारख असलेले प्रकाशक रा. ज. देशमुख मला लाभले होते.

'संपादनकार्य' ही अवघड व कठीण बाब आहे याची मला जाणीव होती. 'पत्रिके'ला जो वाङ्मयीन दर्जा आहे तो वाढला पाहिजे, तिचे बहिरंग अधिक आकर्षक वाटले पाहिजे आणि तिचा लेखकवर्ग महाराष्ट्राच्या सर्व भागांतील, सर्व थरांतील असला पाहिजे आणि 'पत्रिके'तून विविध वाङ्मयीन प्रवाह व्यक्त झाले पाहिजेत असे मला वाटत होते. 'पत्रिका' इतर लोकप्रिय नियतकालिकांसारखी नाही – नसावी, तर तीतून वाङ्मयीन अभिरुची घडत जावी आणि वेगवेगळ्या वाङ्मयीन प्रश्नांची मोकळेपणाने चर्चा व्हावी हा हेतू मनात होता.

१९७३ ते १९७६ पर्यंत १८५ ते १९६ असे आठ अंक प्रसिद्ध झाले. अंक नियोजनपूर्वक प्रकाशित करावा म्हणून लेखकांशी पत्रव्यवहार, विचारविनिमय करणे फायदेशीर ठरते. श्रीज्ञानदेव-विशेषांक आणि कविवर्य तांबे-विशेषांकातील अनेक लेखकांशी चर्चा करण्याचे भाग्य मला लाभले. विशेष अनुदानाच्या अटीमुळे पत्रिकेला वार्षिक समालोचन अंक प्रसिद्ध करावा लागतो. १९७१, ७२, ७३ व ७४ या वर्षांतील वाङ्मयप्रकारांचे समालोचन असलेले लेख 'पत्रिके'तून प्रसिद्ध झाले. यात फ. मु. शिंदे, प्रा. पद्माकर मराठे, डॉ. चंद्रकांत धांडे, डॉ. मोरजे, प्रा. दाव

अनुक्रमणिका

इ. नव्या दृष्टीने व नव्या जोमाने लेखन करणारी मंडळी होती. एकतर ही वाङ्मय-समालोचने त्या त्या वाङ्मयप्रकारात भर टाकणाऱ्या लेखनकृतीचे स्वरूप समजावून देण्याचा प्रयत्न करतात आणि दुसरे असे की ती वाङ्मयप्रकारांतर्गत प्रचलित प्रवृत्तींचे स्वरूप समजावून सांगतात किंवा तो वाङ्मयप्रकार विस्तार पावतो आहे की विकसित होतो आहे त्याचाही शोध घेतात. समालोचनकार केवळ विविध कृतींची नोंद करीत नाही तर लेखनकृतीसंबंधी लिहिता लिहिता तो त्या त्या वर्षातील लेखना-मागील प्रेरणांचा, त्यातून व्यक्त होणाऱ्या प्रवृत्तींचा, प्रयोगशीलतेचा वेध घेत असतो. अशा छोट्या छोट्या वार्षिक समालोचनांमुळे, विशिष्ट कालखंडाच्या अभ्यासामुळे लेखकाच्या वाङ्मयीन कृतीचे परिशीलन केल्यामुळे वाङ्मयेतिहास सिद्ध होतो. वाङ्मयसमालोचनाच्या काही मर्यादा असतात. समालोचकाच्या वाङ्मयीन समजुतींचा रंग वाङ्मयसमालोचनावर चढत जातो. शिवाय लेखकाला सर्वच लेखन उपलब्ध होऊ शकत नाही आणि चांगल्या लेखनाबरोबर 'सुमार' लेखन वाचण्याचे कंटाळवाणे काम करावे लागते. 'पत्रिके'ने वस्तुतः लेखकाला त्या वर्षातील लेखनाची सूची व पुस्तके उपलब्ध करून द्यायला हवीत. पण हे शक्य होत नाही. यासाठी प्रकाशकांनी आपल्या प्रत्येक पुस्तकाची प्रत परिषदेला भेटी-दाखल दिली तर परिषदेचा संदर्भग्रंथसंग्रह तर वाढेलच पण समालोचनही अधिकात अधिक लेखनाचा विचार करू शकेल.

'पत्रिके'त चांगली ग्रंथपरीक्षणे यावीत म्हणून प्रयत्न करताना असा अनुभव आला की, एकतर ग्रंथपरीक्षण वृत्तिगांभीर्याने केले जात नाही आणि दुसरे असे की, ती वर वर चाळून ग्रंथाची कशीबशी ओळखण करणारी असतात. या दृष्टीने मला असे वाटत होते की, परिषदेत एखाद्या ग्रंथावर चर्चा घडवून आणावी व मग त्या चर्चेच्या आधारे काही परीक्षणे द्यावीत. आर्थिक बळ नसल्यामुळे आणि पुस्तकाची चर्चा वस्तुनिष्ठ पद्धतीने करण्याबाबत उदासीनता असल्यामुळे पत्रिकेतील ग्रंथपरीक्षण विभाग अजूनही दर्जेदार वाटत नाही. ग्रंथपरीक्षणात जाणवायला हवी ती ग्रंथ-परीक्षकाची आस्वादक-शक्ती, आकलन-शक्ती आणि मूल्यमापन-शक्ती.

या तीन वर्षांत विठ्ठल रामजी शिंदे, मालाकार चिपळूणकर, ज्ञानपीठ पारितोषिक-विजेते वि. स. खांडेकर आणि सुवर्ण महोत्सवी साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष पु. ल. देशपांडे यांच्या व्यक्तिमत्त्वाचा व वाङ्मयाचा विचार करणारे लेख देण्याच्या मागे एक हेतू होता की, त्यांच्या वाङ्मयाचा पुनः एकदा विचार व्हावा. वि. स. खांडेकर हेच मराठी लघुनिबंधाचे जनक असे सूत्र मांडणारा डॉ. आनंद यादव यांचा लेख वादग्रस्त ठरला याची वाचकांना जाणीव आहेच. वस्तुतः डॉ. यादवांची या लेखनातील भूमिका तात्त्विक दृष्ट्या तपासण्याऐवजी प्रा. ना. सी. फडके यांच्या-सारख्या श्रेष्ठ, ज्येष्ठ लेखकाने जी भूमिका घेतली ती फारशी योग्य नव्हती. त्यातून

एक फायदा मात्र झाला की, लघुनिबंधाच्या स्वरूपाची पुनः एकदा उलटसुलट चर्चा झाली. आपापल्या संशोधनक्षेत्रात काम करणाऱ्या व्यक्तींच्या अभ्यासाचे फलित पत्रिकेतून ठेवले तर साहित्यविषयक समस्यांची चर्चा फलदायी ठरत जाईल. या दृष्टीने 'पत्रिके'तील कितीतरी लक्षणीय लेखांची चर्चा व्हायला हवी होती. तुकारामाच्या एका अभंगाची भाषाशास्त्रीय दृष्टिकोणातून डॉ. चं. द. इंदापूरकर यांनी केलेला विचार, खाडिलकरांचा विनोद ( गो. के. भट ), जोतिराव फुले यांच्या लेखनाची धाटणी ( डॉ. भास्कर भोळे ), अनुभवामृतातील मूलानुभव आणि त्याची अभिव्यक्ती ( डॉ. वि. रा. करंदीकर ), कीचकवध ( गंगाधर गाडगीळ ), तांबे यांची कलाविषयक भूमिका ( डॉ. रा. शं. वाळिंबे ), ज्ञानदेवांचा पंथराज ( वि. मो. केळकर ), ज्ञानेश्वरीतील ज्ञानयोग ( डॉ. रा. शं. वाळिंबे ), 'विविध ज्ञान विज्ञान विस्तारातील काव्यविचार' ( प्रा. वा. ल. कुलकर्णी ) इ. लेख 'पत्रिके'च्या दर्जात वाढ करणारे ठरले.

पत्रिकेच्या तांबे-विशेषांकाचे व ज्ञानदेव विशेषांकाचे स्वागत अनेकांनी केले. या दोन्ही विशेषांकांची योजना पूर्णपणे सिद्धीस गेली असे म्हणता येणार नाही. तांबे यांच्या कवितेचे नवे जुने अभ्यासक आणि त्यांची कुटुंबीय मंडळी यांचे लेखन मिळविता आले. पण तांबे यांच्या प्रमुख कवितांची रसग्रहणे यायची आणि त्यांच्या हस्तलिखित वह्यांच्या आधारे व पत्रव्यवहाराच्या साहाय्याने कवितानिर्मिती प्रक्रिये-संबंधी विचार झाला पाहिजे असे वाटत होते ते राहून गेले. संपादकाच्या पदरी कितीतरी वेळा निराशा येते. एखाद्या लेखाची वाट पाहावी तर तो लेखक ऐनवेळी 'मला शक्य नाही. क्षमस्व' अशा दोन ओळीचे उत्तर पाठवतो. वि. स. खांडेकरांना पारितोषिक मिळाले त्यानिमित्ताने प्रा. ना. सी. फडके यांनी लिहावे म्हणून विनंती केली तर त्यांनी ती अमान्य केली. खरं म्हटलं तर शताब्दीची किंवा त्यांच्या मृत्यूची वाट न पाहता एखाद्या लेखकाच्या वाङ्मयकृतीचा अभ्यास करणारे लेखन समाविष्ट करून एखादा अंक सिद्ध करण्याचे राहून गेले. ज्ञानदेव-विशेषांकाचे प्रकाशन एखाद्या पोथीच्या आकारात करण्याची कल्पना 'कल्पना'चे कल्पक मुद्रक श्री अण्णासाहेब लाटकर यांची! त्यांच्या या कल्पनेमुळे या अंकाला वेगळेच रूप आले. या अंकावर ज्ञानदेवीच्या उपलब्ध झालेल्या सर्वांत जुन्या पोथीचे चांगले छायाचित्र – फोटोस्टॅटकॉपी नव्हे – श्री. पां. ना. कुलकर्णी यांजकडून मिळाले असते तर आमच्या कल्पनेला उठाव मिळाला असता. पण ऐनवेळी धावाधाव करून कै. बनहट्टींच्या संग्रहातील पोथीचे पान छापावे लागले. ही सर्व परिस्थिती माहीत असूनही कुणीतरी संपादकांना दोष दिल्याचे समजते. आणखी एक कल्पना मनात होती. ती म्हणजे स्वातंत्र्यप्राप्तीनंतर प्रसिद्ध झालेल्या लक्षणीय कादंबऱ्यांची समीक्षणे व कादंबरीविषयक प्रश्नांची चर्चा करणारा

अंक सिद्ध करावयाचा. संकल्प आणि सिद्धी यांच्या आड परमेश्वरी इच्छा उभी असते हेच खरं !

या आठ अंकांचे प्रकाशन अनेक कारणाने वेळेवर होत नसे. कागदाची दुर्मिळता, कागदाची वाढती किंमत, छपाईचा वाढता खर्च, अनुदानांचा अपुरेपणा, परिषदेचे तुटपुंजे सामर्थ्य यामुळे 'पत्रिके'च्या प्रकाशनावर परिणाम होतो. त्यामुळे आहे त्या आर्थिक बळाचा वापर करून अंक सिद्ध करणे एवढेच हाती असते. अंकाच्या बहिरंगाचे श्रेय श्री. लाटकर व श्री रा. ज. देशमुख यांचे ! प्रत्येक अंकाचे कव्हर, ले-आऊट इ. बाबतीत मी अनभिज्ञ होतो, पण देशमुख–लाटकरांची सौंदर्यदृष्टी आणि प्रयोगशीलता यामुळे पत्रिकेच्या बहिरंगाचे सर्वांनी स्वागत केले. पहिला अंक प्रकाशित झाला तो घाईघाईत. खूप मुद्रणदोष राहून गेले. काळजीपूर्वक मुद्रिते पाहिली तरी असे कसे झाले याचे मला कोडेच आहे. पण दोषांचा भार संपादकानेच घ्यायचा असतो. मुद्रणदोष राहू नये म्हणून सतत प्रयत्नशील राहिले पाहिजे हे एक संपादकावर आलेले काम ! पत्रिकेला लेखनसहाय्य करणाऱ्या भाऊसाहेब खांडेकरादी ज्येष्ठ, श्रेष्ठ लेखकांनी लेखाबद्दल मानधनाची कधीच अपेक्षा बाळगली नाही. पत्रिका जे मानधन देत होती ते नगण्यच होते. कै. भाऊसाहेब खांडेकरांचे एक पत्र मला स्मरते. तंत्र-विशेषांकासाठी त्यांनी लिहावे म्हणून मी विनंती केली होती. त्यांचे लगेच उत्तर आले. "माझी प्रकृती ठीक नसते तरी लिहितो" आणि वेळेपूर्वी लेख आला. सोबतच्या पत्रात लिहिले होते, "सोबत लेख पाठवीत आहे. तुम्हाला आवडला तरच छापा. अन्यथा परत पाठवा." एका ज्येष्ठ व श्रेष्ठ लेखकाची एवढी ही नम्रता ! त्यांचे वागणे व बोलणे आर्जवी आणि नम्र ! नाहीतर संपादकाला लेखकांचा केवढा मानपान सांभाळावा लागतो. "साहित्यऋषी खांडेकर" असे कुसुमाग्रजांनी म्हटले ते किती समर्पक आहे.

या तीन वर्षांत पत्रिकेला लाभलेल्या यशापयशाची चर्चा मी करणार नाही. डॉ. मालशे यांनी 'पत्रिके'ला वेगळे रूप दिले. तिची प्रतिष्ठा सांभाळण्याचे काम आपण आपल्या परीने केले हेच समाधान ! संपादकीय टिप्पणातून साहित्यविषयक प्रश्नांचा विचार थोडाफार करता आला, दिवंगत लेखकांना आदरांजली वाहता आली आणि ज्या लेखकांचा सन्मान झाला त्यांचे गुणगान करता आले. या तीन वर्षांत 'लेखकाचे जग' न्याहाळता आले आणि त्यातून कितीतरी नवे मित्र जोडता आले. जीविताच्या वाटचालीत जे मिळाले तेवढे स्वीकारून अपेक्षा न बाळगता चालावे लागते हेच खरे !

■

# ग्रामीण मराठी कथेतील विनोद व उपरोध

द. ता. भोसले

---

ग्रामीण विनोदी कथेचा जन्म तसा जुना नाही. जिला पूर्णार्थाने ग्रामीण मराठी विनोदी कथा म्हणता येईल, अशा कथेचा जन्म हा मराठी नवकथेच्या जन्माबरोबरच झालेला आपणास दिसून येईल. गाडगीळ, गोखले, भावे यांनी युद्धोत्तर समाजजीवनाच्या नावीन्यपूर्ण अनुभूती नवकथेच्या रूपांमधून प्रकट केल्या; त्याच वेळी व्यंकटेश माडगूळकर माणदेशी माणसांना आपल्या अस्सल ग्रामीण कथेतून सजीव करीत होते. तसा माडगूळकरांचा पिंड विनोदी कथा लिहिण्यास अनुकूल नसावा. तरीही दुःख आणि दारिद्र्य यांच्या चक्रात सापडलेल्या सज्जन माणदेशी माणसांचे कलात्मक दर्शन घडविताना त्यांनी आपल्या काही अनुभूतींना सौम्य विनोदाचा स्पर्श दिलेला आढळतो; किंवा त्यांनी 'माणदेश' साकार करताना काही विनोदाच्या अंगाने झुकणाऱ्या अनुभूती सौम्य पण नर्मविनोदी पद्धतीने आविष्कृत केलेल्या आपणास आढळतील. माडगूळकरांनी 'माझा बाप' (माणदेशी माणसे); शाळा तपासणी (जांभळाचे दिवस); मारुतराया, आजीने पाहिलेला चोर (व्यंकटेश माडगूळकरांची कथा); जुपी (उंबरठा); पाव्हणा (वाटा); खारीचे पोर (वाळूचा किल्ला) या कथांमधून उपरोध, उपहास यापेक्षा ज्याला आपण शुद्ध अन् सौम्य विनोदी अनुभूती म्हणू, त्यांचा कलात्मक आविष्कार साधलेला आहे. त्यांच्या कथेला वास्तवतेचे भक्कम अधिष्ठान लाभलेले असते. माडगूळकर प्रदेशातील माणूस, त्याच्या भोवती उत्पन्न झालेली विशिष्ट परिस्थिती आणि त्यातून जन्मास येणारा मिस्किल विनोद यांचाच निखळ आविष्कार साधतात. परिस्थितीतून मानवी आचार-विचारांत उत्पन्न झालेली विसंगती अन् औचित्यहानी यांचा संयतपूर्ण आविष्कार ते करीत असतात. तो करीत असताना वास्तवानुभवाचे भान विसरत नाहीत. त्यामुळे माडगूळकरांच्या विनोदी कथा नर्मविनोदी असल्या तरी सतेज स्वरूपाच्या वाटतात. परिस्थितीचे बदलते संदर्भ टाळून, त्यातील विनोदाला उपकारक असणारी तात्कालिकता वगळून, मूळ शुद्ध विनोदी अनुभूतीच्या गाभ्याला हात घालून त्याचे चित्रण ते करीत असल्याने एक विनोदी लेखक म्हणून ग्रामीण मराठी विनोदी कथालेखकांत त्यांचा तसा समावेश होत नसला तरी, ग्रामीण

अनुक्रमणिका

विनोदी कथेचा जन्म त्यांच्याच ' माणदेशी माणसां 'तून झालेला आहे, हे मान्य होण्यास हरकत नसावी.

माडगूळकरांची विनोदी कथा थोडीशी सूक्ष्मपणे न्याहाळली तर ती प्रामुख्याने व्यक्ति-चित्रणात्मक असलेली आपणास दिसून येईल. शिवाय त्या व्यक्तिचित्रणात्मक कथेची कथनशैली, निवेदनकौशल्य वेगळ्या आकर्षक स्वरूपात फारसे जाणवत नाही. शुद्ध विनोदी कथेला आकर्षक निवेदनशैलीची उत्तम जोड असावी लागते. निवेदनाची चातुरी असल्या-शिवाय हास्यकथा यशस्वी होणेच अशक्य. विनोदी कथेमध्ये निवेदनकौशल्याला एक आगळे मूल्य प्राप्त होते. माडगूळकरांच्या विनोदी कथांमध्ये हा निवेदनकौशल्याचा प्रभावी आविष्कार जाणवत नाही. त्यांची निवेदनपद्धत भावकोमल, हळुवार आणि सूक्ष्म अशा काव्यात्म अनुभूतींना साकार करण्यात उदंड यश मिळविणारी आहे. पण तीच विनोदी कथेला तितकीशी उपयोगी पडत नाही. मूळ अनुभूतीला अधिक रंजकता आणून देणारी ढंगदार कथनशैली माडगूळकरांजवळ कमी स्वरूपात जाणवत असल्याने त्यांच्या विनोदी कथा संस्मरणीय ठरलेल्या नाहीत.

विनोदी परंतु पृथगात्म स्वरूपाची जाणीव ठळकपणे होते शंकर पाटील आणि मिरास-दार यांच्या कथालेखनातून. व्यक्तिचित्रांच्याच रूपाने अवतरणारी ही कथनप्रवृत्ती या दोघांच्या कथालेखनात आकर्षक बनली. त्यातही १९५० च्या आसपास सुरू झालेल्या मिरासदारांच्या कथालेखनाने विशेष बाळसे धरले. शंकर पाटील यांनी काही अत्यंत लक्षणीय अशा विनोदी कथा लिहिलेल्या असल्या तरी त्यांची प्रवृत्ती मुख्यतः गंभीर कथा-लेखनाकडे आहे. गंभीर कथालेखनात त्यांची प्रतिमा विशेष रंगते. तसेच ग्रामीण जीवनात उत्पन्न होणाऱ्या विसंगती न्याहाळण्यासाठी त्या व्यक्तिमनाला वेगळ्या सांस्कृतिक मूल्यांचे अधिष्ठान असावे लागते. नागर जीवनाचे संस्कार ज्या व्यक्तिमत्त्वावर विशेषत्वाने झालेले असतात, आणि तेच प्रखर स्वरूपात शेवटपर्यंत टिकून राहतात; त्याच व्यक्तिमनाला ग्रामीण जीवनातली विसंगती चटकन जाणवते. अन् त्यातून उत्तम स्वरूपाची हास्यकथा निर्माण होऊ शकते. या दृष्टीने विचार करता शंकर पाटील यांच्या मनावर झालेले संस्कार हे विशेषत्वाने ग्रामीण आहेत. ग्रामीण संस्कार घेऊन ग्राम-जीवनाचा मागोवा ते घेत असल्याने विसंगती शोधण्यासाठी, किंवा जाणवण्यासाठी म्हणू या; जी एक तटस्थता अन् तद्रूपता आवश्यक असते ती कमी प्रमाणात श्री. शंकर पाटील यांच्या ठिकाणी असावी. त्यामुळे ' इन्व्हाल्व्हमेंट ' अन् अलिप्तता यांच्या भिन्न स्वरूपामुळे त्यांना ग्रामीण जीवनात हास्यमय अनुभूती अधिक प्रमाणात पकडता येत नसावी.

शंकर पाटलांना ज्या काही विनोदी कथा लिहिल्या आहेत त्यामध्ये त्यांची अशी काही लक्षणीय वैशिष्ट्ये आपणास जाणवल्याशिवाय राहात नाहीत. शंकर पाटलांची विनोदी कथा ही विविध वैशिष्ट्यांनी नटलेली कथा असते. ग्रामीण जीवनाच्या ज्या मूल्यविषयक संकल्पना असतात, प्रतिष्ठा-अप्रतिष्ठा याविषयी ज्या धारणा असतात त्यातून त्यांची विनोदी कथा

निर्माण होते. म्हणजेच मूल्यविषयक विसंगती हा त्यांच्या विनोदी कथांचा पहिला विशेष आढळतो. 'नाटक' सारखी विनोदी कथा या प्रकारची म्हणता येईल. ग्रामीण जीवनाचे जे काही आदर्श ( Norms ) असतात; त्यानुसार जीवन जगणाऱ्या व्यक्तीच्या जीवनात परिस्थितीनुसार उत्पन्न होणारे अनुभव ते खुमासदार रीतीने प्रकट करतात. पाटलांच्या कथेत जी थोडीफार अतिशयोक्ती आढळते ती मुद्दाम लादल्यासारखी नसते. वाचकांना ती खुपत नाही. 'ताजमहालमध्ये सरपंच' या कथेत आणि त्यातील इतर विनोदी कथांमध्ये हे वैशिष्ट्य आपणास जाणवते. पाटलांच्या कथेत वास्तवतेतून ( Reality ) उत्पन्न झालेला विनोद असतो. पण ती वास्तवता कधी कधी जशीच्या तशी ते मांडतात; कधी तिची पुनर्रचना करतात. त्यामुळे त्यांची विनोदी कथा सर्जकतेचा आस्वाद देते. ती ( Recreation ) आहे असे वाटते. पाटील हे करीत असताना वास्तवाचा एक तुकडाच उचलून घेतात. किंबहुना तो तुकडा त्यांच्या हातात येतो. अन् ते न्याहाळून मांडताना खुमासदार रीतीने पेश करतात. पाटील आपल्या विनोदी कथेसाठी 'सिच्युएशन'वर अधिक भर देतात. ते ग्रामीण वास्तव अनुभूतीची अशी काही स्थिती–अवस्था–साकार करतात की, त्यातून मानवी स्वभावाचे विचित्र अन् विक्षिप्त नमुने आपल्या समोर उभे राहतात. व्यक्ती, परिस्थिती आणि मूल्यविसंगती यांच्या आधारेच वास्तवतेच्या पायावर त्यांची विनोदी कथा वाचकांना खळखळून हसावयास लावते.

याखेरीज पाटलांच्या कथेत आढळणारा आणखी एक विशेष म्हणजे स्वातंत्र्यानंतर ग्रामीण जीवनात जी राजकीय स्थित्यंतरे होत आहेत, झालेली आहेत, त्यातून उत्पन्न होणाऱ्या हास्यास्पद अनुभूतींना ते साकार करतात. ग्रामपंचायतीमध्ये एखादी बाई असणे, गावामध्ये देखणी नर्स येणे, ग्रामपंचायतीच्या सर्व सभासदांनी किरकोळ कामासाठी दौरा काढणे, त्यात चैन-मौज करणे; दारूबंदीचा नियम भंग करणाऱ्याला दिलेल्या शिक्षेतून संकटेच उत्पन्न होणे इत्यादी गोष्टी त्यांच्या कथांत आढळतात. बदलत्या जीवनाची नोंद घेऊन त्यातून साकार होणारी मिस्किलता टिपून आपल्या विनोदी कथांची विविधता ते वाढवतात. अशा प्रकारच्या कथा म्हणजे बदलत्या अनुभूतींचा आविष्कार जसा असतो; तशाच बदलत्या जीवनावर केलेली ती टीका असते. उपरोधापेक्षा उपहासावर त्यांचा विनोद निर्माण झालेला असतो. परंतु हा उपहासही झणझणीत असण्याऐवजी रंजक स्वरूपाचा असतो. त्यासाठी ते माफक स्वरूपात कल्पकता वापरतात. उचित रीतीने ती वास्तवतेमध्ये एकजीव करतात अन् खमंगपणा वाढविण्यासाठी माफकच अतिशयोक्तीचा वापर करतात. एवढेच नव्हे तर गांभीर्य व विनोद, कारुण्य आणि विनोद यांचे शंकर पाटील अतिशय उत्कृष्ट असे रसायन करतात. त्या कारुण्याचा कडवटपणाही ते त्यातून साधलेल्या विनोदात एकजीव करीत असल्याने पाटलांची कथा कल्पकतेचा मांडलेला खेळ वाटत नाही. त्या माणसांच्या कथा वाटतात. किस्सेवजा वाटत नाहीत. त्यांच्या कथेची नाळ कल्पकतेपेक्षा वास्तवतेशी – बदललेल्या परिस्थितीशी; त्यातून उत्पन्न झालेल्या

' सिच्युएशनशी ' जोडलेली असल्याने विशुद्ध विनोदी कथा लिहिणारा एक समर्थ लेखक म्हणून आज तरी शंकर पाटलांचाच निर्देश करावयास हवा.

शंकर पाटलांच्या विनोदी कथांचा निवेदनढंग काही वेगळाच असतो. ते सतत वाचतो अन् पाहतो आहे असे वाटते त्या निवेदनाला खास असे रूप लाभलेले असते. त्या निवेदनात नाट्यमयता असते. प्रत्ययकारकता, दृग्गोचरत्व, वैशिष्ट्यपूर्ण संवाद आणि मूळ विनोदी अनुभवाला अधिक खुमारी आणणारी मांडणी प्राप्त झालेली असते. त्यांची विनोदी कथा वाचत असताना ती ' साक्षात ' होते अन् वास्तवतेच्या अंशासह कल्पकतेचे पंख लेवून हळुवारपणे फडफडत जाताना भासते. ' धिंड ' आणि ' ताजमहालमध्ये सरपंच ' या दोन्ही विनोदी कथांची निवेदनशैली या दृष्टीने पाहण्यासारखी आहे. थोडक्यात पाटलांची कथा म्हणजे विक्षिप्त पात्रांच्या विसंगत मूल्यधारणा, आणि त्याला मिळालेली वैशिष्ट्यपूर्ण परिस्थितीची जोड अन् त्याचा झालेला ढंगदार आविष्कार असते.

विनोदवृत्तीचा सांस्कृतिक वातावरणाशी संबंध असतो. जो वाचकवर्ग सुशिक्षित आहे, सांस्कृतिक विचारांचा, वातावरणाचा त्याच्या व्यक्तिमत्त्वाला स्पर्श झालेला आहे, ज्याला थोडासा निवांतपणा आहे आणि जो विनोदी अनुभूतीशी पूर्णपणे गुंतलेला नसतो अशा मध्यमवर्गीय वाचकांना विनोदी वाङ्मय आवडते. ते त्यातील हास्याचा आस्वाद घेऊ शकतात. मिरासदारांची घडणच अशा नागरी मध्यमवर्गीय संस्कारांनी झालेली आहे. या नागरी संस्कृतीत विनोदाला वाव अधिक असतो. विनोदवृत्तीचे पोषण ज्या एका विशिष्ट वातावरणात होते, ते मिरासदारांना पुरेपूर लाभलेले आहे; आणि त्यांच्या व्यक्तिमत्त्वात ग्रामीणतेचेही संस्कार गुंतलेले आहेत. ते थोडेसे नागर आणि थोडेसे ग्रामीण स्वरूपाचे व्यक्तिमन आहे ते ग्रामजीवनात स्वतः गुंतलेले असूनही अलिप्त राहिलेले आहेत. त्यामुळे त्यांच्या विनोदी कथा पाटलांच्या कथांपेक्षा पूर्णतः भिन्न प्रकारच्या वाटतात. पाटील ग्रामीण वास्तवावर भर देतात; तर मिरासदार कल्पकतेवर भर देतात. कल्पकतेच्या साह्याने ते त्या जीवनाचा असा काही तुकडा तोडतात की, तो तेवढ्या-पुरता स्वतंत्र वाटतो तो तोडलेला जाणवतसुद्धा नाही; इतकी त्यात सफाई असते. पण त्यामध्ये कल्पकतेच्या मानाने वास्तवता कमी प्रमाणात जाणवते. त्यामुळे त्यास अनेकदा किस्सेवजा स्वरूप प्राप्त होते. विक्षिप्त पात्रे, त्यांच्या विक्षिप्त घटना, परिस्थितीने धारण केलेले मजेशीर आकार यांचे आकर्षक कथन करण्यावर त्यांचा विशेष भर आढळतो. शिळोप्याला गप्पा मारताना एखाद्या हरहुन्नरी कथेकऱ्याने मनोरंजक किस्से कथन करावेत; अन् त्यातून मानवी स्वभावाचे मजेशीर ' टाइप ' सूचित करावेत, त्याप्रमाणे मिरासदारांच्या विनोदी कथांचा ' बाज ' असतो. मिरासदार विनोदी पात्रांचा कथेसाठी अधिक वापर करतात. पाटील प्रसंगांना विशेष वापरतात. विशिष्ट गुणदोषांनी नटलेली ही माणसे विशिष्ट परिस्थितीत कशी वागतील; याचा विचार करून मिरासदार त्यातून विनोद

साधतात. त्याला थोडीशी अतिशयोक्तीची जोडही देतात. म्हणून मिरासदारांची कथा ही जगावेगळ्या माणसांची कथा असते. 'दळण', 'व्यंकूची शिकवणी', 'माझी पहिली चोरी', 'माझ्या बापाची पेंड' या कथेतील माणसे पाहिल्यावर वरील विधानाची सत्यता तावडतोब पटू शकेल. मिरासदारांच्या कथेतील मिस्किलपणा आणि गमतीदार विक्षिप्तपणा घटनांनी घेतलेल्या विक्षिप्त वळणाबरोबरच किंबहुना त्यापेक्षा अधिकच लोकविलक्षण माणसांमुळे उत्पन्न झालेला असतो. मनुष्यस्वभावावर आणि मानवी व्यवहारावर गमतीदार प्रकाश टाकण्याची एक विशेष शक्ती त्यांच्या विनोदी कथांमध्ये आढळते. परंतु त्या शक्तीचे ते अधिक कल्पकतापूर्ण आणि अतिशयोक्तिपूर्ण वर्णन करीत असल्याने ग्रामीण जीवनाशी क्षीण स्वरूपाचे नाते असलेल्या माणसांच्या कथा असे त्यांच्या कथांना स्वरूप प्राप्त होते.

आणखी एक विशेष म्हणजे मिरासदार आपल्या विनोदी कथांच्या अखेरीला एक जबरदस्त कलाटणी देऊन हास्यरसाची लाट उत्पन्न करतात. पाटील अशी कलाटणी देण्याच्या भानगडीत पडत नाहीत. 'दळण', 'नदीकाठचा प्रकार', 'व्यंकूची शिकवणी' यासारख्या कथा अशा विस्मित करणाऱ्या कलाटणीमुळेच विशेष विनोदी झालेल्या आहेत. निरोप, माझी पहिली चोरी, शाळेतील समारंभ यासारख्या कथा अतिशयोक्त स्वरूपाच्या वाटतात. पण त्यातूनही मानवी स्वभावाचे थोडेसे अतिशयोक्त वर्णन साधलेले असल्याने ती अतिशयोक्ती त्या क्षणापुरती वाचकांना विशेष खटकत नाही.

मिरासदारांच्या विनोदी कथांमध्ये बदलत्या समाजजीवनातील विनोदी अनुभूती प्रकट होत असल्या तरी त्या विनोदी अनुभूतींचा समूळ आणि संपूर्ण आविष्कार साधलेला नसतो. या बदलत्या परिस्थितीचा थोडासा आधार घेऊन त्यातून लोकविलक्षण माणसाचे हास्यजनक आचार-विचार कल्पकतेच्या साहाय्याने थोडेसे अतिशयोक्त करून सांगण्याकडे त्यांचा कल आढळतो. अलीकडच्या त्यांच्या विनोदी कथांमध्ये आपणास याचे प्रत्यंतर येते. बदलत्या परिस्थितीमुळे निर्माण झालेले किती तरी सुप्त विनोदी भाव त्यांच्या चिमटीतून निसटून जात असावेत असे वाटते. ग्रामीण जीवनाच्या तळातून उत्पन्न झालेल्या विशुद्ध विनोदाचे दर्शन त्यांच्या कथेतून कमी जाणवते यात शंका नाही.

मात्र मिरासदारांची निवेदनशैली खास वैशिष्ट्याने नटलेली अशी आहे. ती सतत ऐकावी व वाचावी अशी वाटते. येथे आपण त्यांच्या निवेदनाची स्वतंत्रपणे लज्जत चाखीत आहोत असे वाटते. त्यांचे हे निवेदन अनुभूतींच्या जाणिवेच्या आड येत नाही. वास्तविक पाहता त्यांच्या विनोदी कथांतील अनुभव आपल्या चांगल्या परिचयाचा असतो. परंतु तो अनुभव ज्या निवेदनशैलीतून प्रकट होतो; त्याची स्वतंत्रपणे आपण चव घेत असल्याने मिरासदारांच्या कथेत या निवेदनाला एक स्वतंत्र मूल्य प्राप्त झालेले असते. त्या निवेदनातून सौम्यशा अतिशयोक्तीने ते मूळच्या अनुभवाला मिस्किलता प्राप्त करून देतात. त्यांच्या निवेदनातील ते लटके गांभीर्य, तो मिस्किलपणा, काही मार्मिक

शब्दांचा उपरोधिक स्वरूपात केलेला वापर या गोष्टी त्यांच्या कथेचा आपणावरील अंतिम परिणाम अधिकच गडद करीत असतात.

थोडक्यात, मिरासदारांनी मराठी विनोदी कथेचे एक वेगळेच रुचिर दर्शन घडविले, एक स्वतंत्र दालन निर्माण केले. शहरी संस्कार झालेल्या नागर मनाला आपल्या वर्तनादर्शापेक्षा वेगळ्या प्रकारचे जे आदर्श जाणवलेले असतात त्यांतील विसंगती शोधण्यासाठी किंवा ती शोधून मांडण्यासाठी काही वास्तवता, काही कल्पकता घेऊन, तिला अतिशयोक्तीची जोड देऊन विशिष्ट मानवी स्वभावाचे नमुने अधिक हास्यास्पद करून किस्सेवजा स्वरूपात मांडणे ही पद्धत प्रा. द. मा. मिरासदारांनीच प्रामुख्याने सुरू केलेली आहे. त्यामुळेच त्यांचा विनोद कोणतीही जखम करीत नाही. सामाजिक जीवनावर उपरोधिक स्वरूपाचे भाष्य करीत नाही, अथवा टीका करीत नाही. वाटल्यास त्याचे सौम्य स्वरूपाचे विडंबन करण्याकडे त्यांचा कल झुकलेला आपणास काही कथांमधून थोडाफार जाणवेल.

अलीकडच्या पिढीतील लेखकांपैकी रा. रं. बोराडे आणि आनंद यादव या दोघांनीही काही विनोदी कथा लिहिलेल्या आहेत. बोराडे यांच्या ' लगीन ', ' मिटिंग ', ' ताळमेळ ', ' योजना ', ' सत्कार ', ' वरात ', ' निवाडा ', ' पसंती ', ' गोंधळ ' इ. अनेक कथा विनोदी ग्रामीण जीवनाचा रसिला आविष्कार करणाऱ्या आहेत. बोराड्यांच्या कथा शंकर पाटलांच्या कथेप्रमाणे पात्रे, प्रसंग आणि विलक्षण परिस्थिती यांच्या मिलाफातून साकार झालेल्या असतात. ग्रामीण जीवनातील विसंगती त्यांना चांगल्या रीतीने जाणवते, पण ती विसंगती फुलविताना ते विशेष काळजी घेत नसावेत असे वाटते. विनोदाचे बीज उत्तम रीतीने फुलवीत फुलवीत नेण्याऐवजी ते घाईघाईने प्रकट करून मोकळे होत असावे. तरीही त्यांच्या कथांमध्ये विनोदी ' सिच्युएशन ' पकडण्याची ताकद जबरदस्त आहे याची खात्री पटते. बोराडे आज बदलत जाणाऱ्या ग्रामीण जीवनातून उत्पन्न झालेले विनोदी प्रसंग उत्तम रीतीने टिपतात. ते टिपत असताना परस्परविरोधी स्वभावाची माणसे, सुसंगत विसंगत असे प्रसंग, वर्तनाविषयीचे नागर आणि ग्रामीण आदर्श ( Norms ) यांच्या ताणतणावातून विनोदी अनुभूती शोधतात. काही वेळा अतिशयोक्तीचा ते वापर करीत असले तरी ती मूळ वास्तवाला घट्ट चिटगलेली असल्याने भडक व रसहानी करणारी वाटत नाही. ' सत्कार ', ' वरात ', ' गोंधळ ', इ. कथांमध्ये आपले नागरी वर्तनादर्श आणि त्यात निर्माण झालेली विसंगती विशेष जाणवते.

त्यांच्या विनोदी कथांना किस्से किंवा चुटके यांचे स्वरूप येत नाही. तो प्रसंगनिष्ठ आणि व्यक्तिनिष्ठ असतो. भडकपणाचा अतिरेकही त्यांनी टाळलेला असतो, तरीही त्यांच्या कथा वाचून कुठेतरी व कशामुळे तरी एक अनामिक असमाधान मनात टसटसत असते. ती विनोदी अनुभूती तशी हृदयाला भिडत नाही. पक्वान्नासाठी लागणारी सामग्री सर्व उत्तम स्वरूपाची असूनही तयार केलेल्या पक्वान्नात काहीतरी कमी असावे अन् नेमके काय

कमी आहे याचाही पूर्णपणे शोध लागू नये अशी अवस्था रा. रं. बोराडे यांच्या कथा वाचून उत्पन्न होते.

आनंद यादवांचा मूळ प्रतिभाधर्म सूक्ष्म, तरल, संवेदनशील अशा अनुभूती ताकदीने उभ्या करणे हा आहे. पंचेंद्रियांची तृप्ती करण्याची शक्ती त्यांच्या कथेत आहे. नियती, व्यक्ती, परिस्थिती अन् विकृती यांतून निर्माण झालेल्या सशक्त आणि नावीन्यपूर्ण गंभीर स्वरूपाच्या अनुभूती प्रकट करणे हा त्यांच्या प्रतिभेचा धर्म आहे. त्यांची निवेदन-शैली सतेज, ताजी, रसरशीत आणि थोडीशी प्रतिमापूरित असल्याने गद्यकाव्याचे लेणे अवतरून त्यांची कथा जन्मास येते. अशा सूक्ष्म भावानुभूतीला ' रूप ' देणाऱ्या यादवांनी काही विनोदी कथा लिहिलेल्या आहेत. त्या कथा किस्से किंवा चुटकेबाज नसतात. पण हाती आलेली विनोदी ' सिच्युएशन ' ताकदीने, पूर्णपणे अन् ऐटबाज – नखरेल भाषेत मांडताना त्या सिच्युएशनची सांडासांड होते. कथेच्या ओंजळीत विनोदी अनुभूती जितकी यायला हवी तितकी आलेली नसते. पण जी पकडलेली असते, तिने अपेक्षाभंग होत नाही, सौम्य विनोदाची पखरण झालेली असते. त्यांच्या कथांतून विनोद दरवळत असतो. जाणवतो पण रसिकाच्या मनाला मिठी घालत नाही. त्यांचा विनोदही औचित्य-विसंगतीतून निर्माण झालेला अन् वास्तवाधिष्ठित असा असतो. ग्रामीण जीवनातील विनोदी अनुभूती त्यांना भावतात—जाणवतात, पण त्या प्रकट करताना नीटपणे प्रकट होत नसाव्यात असे वाटते. कौटुंबिक जीवनातील, आणि विशेषतः ग्रामीण समाजजीवनातील लोकविलक्षण माणसे, प्रसंग अथवा परिस्थितीतून उत्पन्न झालेल्या विसंगती यांचा आविष्कार करीत असताना ते कल्पकतेचा व अतिशयोक्तीचा विशेष वापर करीत नसल्याने त्यांची विनोदी कथा गालाला खळी पाडून जाते. कदाचित ग्रामजीवनात खदखदणाऱ्या कारुण्याला बिलगलेले विनोदी अनुभूतीचे कण पूर्णपणे अलग न करता त्यासह ते शब्दांकित करीत असताना कारुण्य व विनोद या दोहोलाही समांतर स्वरूपात आविष्कृत करण्याची त्यांची निवेदनपद्धती असल्याने तो निर्भेळ स्वरूपात आपणाला प्रतीत होत नाही. तरीही ग्रामीण कथेतील विनोदाला सशक्तपणा आणण्यास या दोघांनी चांगला हातभार लावलेला आहे यात शंका नाही.

अगदी अलीकडे बा. भ. पाटील, प्रा. द. ता. भोसले, बाजीराव पाटील, द. स. काकडे यांनीही विनोदी कथांमध्ये भर घातलेली आहे. बा. भ. पाटलांचा ' घरची दशमी ' आणि द. ता. भोसले यांचा ' पाळत ' हे दोन कथासंग्रह पूर्णपणे विनोदी स्वरूपाचे आहेत. पाटलांच्या कथेत राजकारण आणि सुधारणा यामुळे खेड्यात उत्पन्न झालेल्या विसंगतीवर भर असतो. पात्रे, संवाद, निवेदनाची पद्धत, मूळ अनुभूती यांचा मेळ उत्तम असूनही कथा पूर्ण विनोदी होत नाही. कथा वाचल्यावर काही तरी अपूर्ण असल्याचे जाणवते. एकतर या बदलत्या जीवनातील विसंगती ते पूर्णपणे पकडीत नसावेत अन् पूर्णपणे प्रकटही करीत नसावीत. पाटील, सरपंच, बाई, बाटली व यातून उत्पन्न झालेल्या

अनुक्रमणिका

भानगडी यांचे फार वरवरचे चित्रण थोडेफार वेतलेल्या स्वरूपात प्रकट करतात. अनेकदा खुमासदार अन् मिस्किल अशा निवेदनावर लक्ष केंद्रित केल्याने जे प्रकट करावयाचे तेच हातातून निसटून गेलेले असते. त्यांची विनोदी कथा आता रूप धारण करते, फुलते असे वाटते; तोच ती संपलेली असते. अपेक्षाभंग करते. हाती आलेल्या रसरशीत अनुभूतींची अशी हेळसांड केल्याने त्यांची विनोदी कथा म्हणावे तसे समाधान देत नाही. पण निवेदनाची खास अशी माधुरी त्यांच्या कथा आपणास खचित देतात. मराठीतील असे चटपटीत निवेदन वा. भ. पाटील यांच्या कथेत आपणास त्यांच्याविषयीच्या अपेक्षा वाढविण्यास कारणीभूत ठरते. प्रा. द. ता. भोसले यांच्या कथेतील विनोद बदलत्या समाजजीवनापेक्षा ग्रामीण जीवनाच्या लोकविलक्षण व्यक्ती आणि प्रसंग यातून उभा राहतो. विनोदी अनुभूती समूळ साकार करण्यात त्यांना यश येत असले तरी निवेदनात त्यांची कथा थोडीफार अपुरी पडते असे वाटते. तरीही मिरासदारांच्या कथेप्रमाणे प्रौढांचे जग आणि बालजग यांच्यातील विसंगती त्यांनी उत्तम रीतीने प्रकट केलेली आहे. शाळा-मास्तर, धडपडणारी मुले, मुलांचा चौकसपणा आणि वैशिष्ट्यपूर्ण ' सिच्युएशन ' यांचा मिस्किल आविष्कार त्यांच्या कथेत जाणवतो. अवास्तवता, कल्पकता, अतिशयोक्ती इ. गोष्टी त्यांच्या कथेत आढळत नाहीत हे खरे असले तरी शंकर पाटील व मिरासदार यांच्या विनोदी कथांची वैशिष्ट्ये आपल्या कथेत आणण्याचा त्यांचा प्रयत्न अनेकदा शिवधनुष्यासारखा ठरतो. विनोदाला निकोप रीतीने फुलविण्याची ताकद त्यांच्या ठिकाणी असली तरी एक विनोदी लेखक म्हणून आपला स्वतंत्र ठसा त्यांना अद्याप उमटविता आलेला नाही. बाजीराव पाटील व काकडे यांच्याकडेही द. ता. भोसले यांच्याप्रमाणे ' पोटॅंशियल ' अशी विनोदी शक्ती खूप आहे. बाजीराव पाटील यांनी फार थोड्या कथा लिहिल्या तरी त्यांची त्यातूनही ताकद जाणवल्याशिवाय राहात नाही. काकडे यांच्याही कथा अशाच अपेक्षा वाढविणाऱ्या आहेत. व्यवहारी मागणीच्या लाटेत हे अलीकडचे लेखक सापडले नाहीत तर मराठी ग्रामीण कथेला व विनोदी कथेला काही तरी बाळसे प्राप्त करून देतील. आज मिरासदारांची वाट चालणारा लेखक आढळत नाही ही प्रा. वा. ल. कुलकर्णी यांची खंत वा. भ. पाटील, भोसले, काकडे आणि बाजीराव पाटील यांच्या कथा कमी करतील अशी आज तरी आशा वाटते.

ग्रामीण विनोदी कथांचा हा धावता व संक्षिप्त आढावा घेतल्यानंतर उपस्थित केलेल्या काही प्रश्नांचा मागोवा आता येथून पुढे घेण्यास प्रत्यवाय नसावा.

विनोद हे ग्रामीण जीवनाचा आविष्कार करणारे साधन की साध्य झाले आहे, असा प्रश्न वास्तविक उपस्थित होऊ नये. विनोदाकडे लेखकाचा पाहण्याचा दृष्टिकोण, त्याची उपयोजना करण्याची धारणा, अन् विनोदाचे कथेतून प्रकट होणारे स्वरूप यावर साधन आणि साध्य ठरत असते. त्यापेक्षा एकूण ग्रामीण जीवनात विनोदी अनुभूतींचे अस्तित्व किती व ते ग्रामीण लेखक प्रकट करतो काय ? हा प्रश्न खरा महत्त्वाचा आहे. आज

ग्रामीण जीवनात सुप्त स्वरूपात अनेक विषय असूनही त्याचा संपूर्ण आविष्कार आजचा लेखक करून घेत नाही. विशिष्ट स्वरूपाच्या भूमिकेने ( Angle ने ) विशिष्ट स्वरूपाचे अनुभव विशिष्ट ढंगाने व्यक्त करण्याची एक साचेबंद पद्धत आज रूढ व मान्य झालेली असल्याने ग्रामीण जीवनात बदलत्या परिस्थितीतून उत्पन्न होणारे अनेक 'पोटेंशियल' विनोदी अनुभव प्रकट झालेले नाहीत असे आजच्या कथा वाचून वारंवार मनात येते. तसेच वास्तव असलेल्या ग्रामीण जीवनात विनोदाचे सुप्त गुण किती आहेत याचाही जाणीवपूर्वक विचार आजचा लेखक विशेष करीत नाही. मध्यमवर्गीय नागर वाचकांच्या ज्या अपेक्षा असतात, आचार-विचारांचे जे आदर्श असतात, त्यांना समोर ठेवून त्यातून प्रतीत होणारी विसंगती प्रामुख्याने प्रकट केली जाते. आजची मिरासदारांची कथा तर urban interpretation of rural life अशा प्रकारेच अवतरते असे वाटते. यातही तसे गैर नाही; हे खरे असले तरी ग्रामीण जीवनामध्ये तेवढाच आणि त्याच प्रकारचा विनोद असतो असा त्याचा अर्थ नाही. विनोदनिर्मिती साधावयाची आहे याचा मनाशी प्रथमतःच अंदाज बांधून मतात हेतू ठेवून छोट्याशा ग्रामवास्तवाला अतिशयोक्तीचा व असंभाव्यतेचा भडक रंग देऊन त्याची कथा 'तयार' करण्याची व्यवहारी भूमिका आजच्या साऱ्याच लेखकांना सोयीस्कर वाटत असावी असे वाटते. त्यामुळे ते केवळ विनोदासाठी तयार झालेले विनोदी लेखन आहे असे वाटू लागते. विनोदनिर्मितीच्या पारंपरिक कल्पना मनाशी धरून त्यात बसणारा ग्रामीण वास्तवाचा तुकडा लोकविलक्षण पात्रांद्वारे प्रकट करणे म्हणजे विनोदी कथा हीच कल्पना आजकाल जाणवते. त्यामुळे सशक्त बनलेला विनोद त्याच कारणांनी दुबळा व साचेबंद झालेला असावा अशी रास्त शंका वाटते.

त्यामुळेच ग्रामीण जीवनाची विशिष्ट अंगेच निवडली जातात; असे दिसते. वेरकी अन् वनेल पात्रे, भावडा आणि वावळट नोकर वा सामान्य माणूस, त्यांच्या उचापती; बाई, बाटली आणि गावकीचा कारभार यांची वेगवेगळी प्रमाणे घेऊन त्यातून विविध रूपबंध निर्माण करावयाचे, त्यांना अतिशयोक्तीचा मीटमसाला लावायचा अन् ढंगदार निवेदनाची खमंग फोडणी देऊन त्याचे वेगवेगळे पदार्थ म्हणून वाढावयाचे असा प्रकार आजच्या लेखनात आढळतो. त्यामुळे ग्रामीण जीवनाची काही विशिष्ट अंगेच पुन्हा पुन्हा किरकोळ बदल होऊन विनोदी रूपाने प्रकट होताना दिसतात. भाबडेपणा, वेरकीपणा, अज्ञान, अंधश्रद्धा आणि सांकेतिक वर्तनादर्श यांचाच आविष्कार आजच्या विनोदी कथांतून प्रामुख्याने होतो. राजकारणाची दाहकता आणि त्यातून सामान्य माणसाची अकारण होणारी ससेहोलपट; राजकारणाला व्यवहारात आलेला विकृतार्थ, त्यातून बोकाळलेला तत्त्वशून्य आचार, सरकारच्या विविध योजना आणि त्यांचा पदोपदी जाणवणारा फजितवाडा इ. अनेक विषय शुद्ध व संपूर्ण विनोदी स्वरूपात अद्याप आलेले नाहीत. बदलते वातावरण, बदलती राजकीय व सामाजिक परिस्थिती आणि त्यातून ग्रामजीवनाला लाभत चाललेले

वेगळे रूप या सर्वांची दखल आजचा लेखक घेत असला तरी, त्याचा समरसून आणि सर्वांगीण आविष्कार घडत नाही. हुकमत असलेल्या साच्यात त्यातला जेवढा भाग बसविता येईल, तेवढाच जीवनांश आजचा लेखक उचलतो; बसवितो आणि आजच्या वाचकांना पसंत पडेल अशा रीतीने मांडतो असे आपणास दिसून येईल. त्यामुळे आजचा विनोद ( Creative ) स्वरूपाचा कमी वाटतो. त्याची आवाहनशक्ती दीर्घकाळ टिकेल की नाही याची त्यामुळेच शंका वाटते.

आजच्या ग्रामीण कथेत उत्तम रीतीने केलेला उपहास जाणवतो. विडंबन तर जवळ जवळ दिसत नाही. व्यक्तीच्या विडंबनाचा आविष्कार नाहीच नाही. काही आदर्श मानलेल्या प्रसंगांचे अतिशयोक्तीच्या आधारे विडंबन केलेले आहे. अतिशयोक्तीचा सढळ वापर आजच्या विनोदी कथालेखनात जाणवतो, पण श्लेषात्मक किंवा शब्दनिष्ठ विनोद त्या मानाने कमी आहे. विसंगती आणि अतिशयोक्ती यांच्या आधारे ' सरूप ' होणारी विनोदी कथा वैचारिक संघर्षापासून दूर असल्याने उपरोधातून निर्माण होणारा विनोद आढळतच नाही. ग्रामीण अनुभूतीतून उपरोध निर्माण करावयाचा असेल तर ग्रामीण व नागरी अभिरुचींचा वैचारिक संघर्ष आविष्कृत करणे आवश्यक असते. यातूनच वैचारिक उपरोध निर्माण होतो. तो आज तरी दिसून येत नाही. याचे कारण सामाजिक दंभाढोंगाचे ग्रामीण जीवनात पडणारे प्रतिबिंब आजच्या विनोदी कथेमध्ये व्यक्त होत नाही, आणि जे थोडेफार झालेले आहे तेही वरवरचे व मागे म्हटल्याप्रमाणे सोयीस्कर वाटणाऱ्या अनुभव-साच्यात कापून-कोंबून बसविणारे असे असल्याने ' एक गधेकी कहानी ' यासारखा उपरोध आजच्या विनोदी लेखनात फारसा आढळून येत नाही. राजकीय, सामाजिक जीवनातील अर्थपूर्ण विसंगती टिपण्याची जागृत जाणीव आता उत्पन्न व्हावयास हवी आहे.

कारुण्याच्या पोटात दडलेला निर्भेळ विनोद व्यक्त करण्यासाठी तो अनुभव फार मोठी किंमत व शक्ती मागत असतो. त्यासाठी लेखकाजवळ ताटस्थ्य आणि तादात्म्य, गुंतणे आणि अलिप्तता या गोष्टी तर हव्यातच; पण फार मोठी वैचारिक झेप, दूरदृष्टी ( Insight ) असणे आवश्यक आहे. माडगूळकर, शंकर पाटील, मिरासदार, आनंद यादव यांच्या ठिकाणी याची शिदोरी असली तरी ' आसू 'चे ' हसू 'त रूपांतर करण्याची परिपूर्ण साधना अद्याप पूर्णावस्थेला गेलेली नाही असे म्हणता यावे. करुणरम्य प्रसंगातून उत्पन्न होणारा लसलसता भावोद्रेक पचवून; त्या पलीकडे जाऊन निखळ, निर्भेळ विनोदाचा प्रदेश पाहणे आज ग्रामीण विनोदी लेखकांना पूर्णपणे साध्य झालेले आहे असे म्हणता येईल असे वाटत नाही. या लेखकांकडे ही शक्ती आहे; तिचा त्यांनी समाधानकारक प्रत्यय आणून दिलेला असला तरी त्यास विश्वात्मक रूप तितकेसे लाभलेले आहे असे कितपत म्हणता येईल ? आजचा ग्रामीण समाज अर्धा ग्रामीण, अर्धा नागरी बनत चालला आहे. आपण कुठून आलो आणि कुठे चाललो आहोत याचे भान या समाजाला तितकेसे नाही. तो मूल्यहीन, श्रद्धाहीन बनला असून पाण्याच्या भोवऱ्यात गरगरणाऱ्या काटकीसारखी त्याची अवस्था झालेली

आहे. त्याकडे अन्तर्मुख होऊन पाहावयाचे आणि मिस्किल मनाने त्याचे चित्रण करायचे अशी भूमिका घेतली तर यात्र समाजजीवनात विनोदाची प्रचंड बीजे आहेत याची जाणीव होईल. ही बीजे शोधणारा व मांडणारा, त्यात गुंतूनसुद्धा अलिप्त राहणारा लेखकच कारुण्यातून विनोदाची निर्मिती साधू शकेल. जोपर्यंत ग्रामीण समाजातील कौटुंबिक भाव-जीवनाचा आविष्कार परिपूर्ण स्वरूपात होणार नाही; तोपर्यंत कारुण्य आणि विनोद यांचे मिश्रण झालेले आपणास आढळणार नाही. या उपेक्षित अंगाकडे अधिकाधिक लक्ष जाणे आवश्यक झालेले आहे.

आजचा ग्रामीण लेखक ग्रामीण Reality मध्ये गुंतलेला आहे. अशा प्रकारचे गुंतणे आवश्यकच असते. पण केवळ गुंतणे ( Involvement ) व पूर्ण गुंतणे यातून विनोद-निर्मिती होत नाही. ती विनोदाला मारक ठरते. हे लेखक आज बदलत्या वास्तवात वाढत आहेत; त्यात गुंतून पुन्हा अलिप्तता अंगी आणणे शक्य झाले तरच नवीन प्रकारचा विनोद निर्माण होणार आहे. शहरी आणि ग्रामीण, ग्रामीण व आधुनिकतेचे जोरकस प्रवाह ( Forces ) आज एकमेकात गुंफले जात आहेत. त्यामुळेच राजकीय व सामाजिक प्रश्न आज उत्पन्न होत आहेत. काही फॅड्स उत्पन्न होत आहेत. त्यामध्ये गुंतूनदेखील तटस्थतेने पाहण्याची ताकद किती येईल यावर उद्याचा ग्रामीण विनोद अवलंबून राहणार आहे. विनोदाचे मर्म जाणणारा, जबरदस्त अशी 'इनसाईट' असलेला तसाच संवेदनशील मनोवृत्ती जोपासणारा, कलात्मक भान आणि बदलत्या जीवनातील अंतर शोधणारा, अंतर्मुख होऊन, आर के. लक्ष्मणप्रमाणे, उच्च पातळीवरील खेळकर विनोदा-तून सामाजिक व्यंगावर भाष्य करणारा, मोठ्या प्रतिभेचा आणि त्याद्वारे सुप्त विनोदी शक्तीचा शोध घेणारा लेखक ग्रामीण विनोदी कथेला आज आहे त्यापुढचा मार्ग दाखवू शकेल. ज्या लेखकांनी विनोदी कथेला सामर्थ्य दिले; त्याच लेखकांनी आपल्या लेखनाद्वारे विनोदी कथेला मर्यादा घातलेल्या आहेत. त्या मर्यादा क्षीण करण्याची आज खरी गरज आहे. त्यावर उद्याची विनोदी कथा अवलंबून आहे असे म्हणावेसे वाटते.

■

## साभार स्वीकार

( १ ) फडके भालचंद्र ( संपा. ) : कथाकार खानोलकर, नूतन प्रकाशन, पुणे ३०; रु. ९

( २ ) गोसावी दत्तात्रेय कृष्ण : श्री आनंदमूर्ति स्वामी ब्रह्मनाळकर यांचे चरित्र, वा. ग. गोसावी, ब्रह्मनाळ; रु. ५

( ३ ) मुक्तेश्वर : आराध; एम. के. घोडके, एकता कार्यालय, तुळजापूर; रु. १२

अनुक्रमणिका

# ‘ प्राचीन व मध्ययुगीन धर्मकल्पना आणि मराठी संत ’

**गो. म. कुलकर्णी**

---

डॉ. स. रा. गाडगीळ यांची ‘ प्राचीन व मध्ययुगीन धर्मकल्पना आणि मराठी संत ’ ही पुस्तकरूपाने प्रसिद्ध झालेली व्याख्यानत्रयी संतसाहित्याच्या अभ्यासाच्या दृष्टीने उपयुक्त ठरणारी आहे डॉ. गाडगिळांच्या या व्याख्यानत्रयीत संतसाहित्याचा विचार लोकसंस्कृतीच्या पार्श्वभूमीवरच केलेला आढळतो. डॉ. रा. चिं. ढेरे यांचा ‘ संतसाहित्य आणि लोकसाहित्य ’ हा ग्रंथही याच विषयाला वाहिलेला आहे. डॉ. ढेरे आणि डॉ. गाडगीळ हे दोघेही लोकजीवनाच्या अनुषंगानेच संतसाहित्याचा विचार करणारे; परंतु दोघांच्या भूमिकेत आणि विवेचनपद्धतीत बराच फरक आहे. ढेरे यांची विवेचनपद्धती संतसाहित्यातील आशयाप्रमाणेच संतसाहित्यातील निर्मितिप्रक्रियेवर, रचनाबंधावर, आकलन-आस्वादनाच्या पद्धतीवर प्रकाश टाकीत जाते, तर गाडगिळांचा भर आहे तो मार्क्सच्या ऐतिहासिक वस्तुवादी दृष्टिकोणातून संतकार्याचा मागोवा घेत जाण्यावर. संतकार्याची सामाजिक-सांस्कृतिक पार्श्वभूमी स्पष्ट करण्यावर गाडगिळांची ही भूमिका त्यांच्यापुरती निःसंदिग्ध असली तरी तशी आग्रही नाही. हे नमूद करण्याचे कारण, सामान्यतः मार्क्सवादी विचारांचे मराठीत होणारे आक्रस्ताळे अवतरण. अशा आक्रस्ताळेपणापासून गाडगिळांचे विवेचन अलिप्त आहे. गाडगिळांची दृष्टी निखळ तत्त्वजिज्ञासूची आहे. मार्क्सवादी भूमिकेचे मराठीतील वितरण बहुधा ढोबळही असते. हा ढोबळपणा गाडगिळांच्या पुस्तिकेतही उतरला आहे; पण याचा संबंध गाडगिळांच्या वृत्तीशी नसून अल्पावकाशात विचारांच्या व्यापक क्षितिजांना स्पर्श करण्याच्या त्यांच्या येथील उपक्रमात आहे.

डॉ. ढेरे आपले विवेचन संतकालात प्रचलित असलेल्या लोकसंस्कृतीच्या आधारे करतात तर गाडगीळ ही विशिष्ट संस्कृती कोणत्या कारणांनी, कोणत्या परिस्थितीत उद्‌भवली ते साऱ्या नकाशासह आपल्यासमोर मांडू इच्छितात. वैदिक आर्य आणि आर्यपूर्व अवैदिक समाज यांच्या आर्थिक-सामाजिक धारणांच्या उगमापासून ते

अनुक्रमणिका

संतप्रणीत भक्तिपंथाच्या आगमनापर्यंतचा चार पाच हजार वर्षांचा आलोक, गाडगिळांनी आपल्या कक्षेत आणण्याचा येथे प्रयत्न केला आहे. प्राचीन वैदिकांचा यज्ञ आणि मध्ययुगीन तंत्रसाधना, या दोनही यातुप्रधान धर्मकल्पनांचा अन्वयार्थ समजल्याखेरीज या साऱ्यांतून बाहेर पडू पाहणाऱ्या भक्तिविचारांचा उमज पडणार नाही, अशी गाडगिळांची भूमिका आहे. त्यांनी एवढ्या व्यापक अवकाशाला येथे पालाण घालण्याचे कारण हेच. संतसाहित्याच्या तपशीलवार चर्चेपेक्षा मानवी जीवनातील आदिम स्थित्यन्तरांची, तदनुषंगिक सांस्कृतिक-धार्मिक परिवर्तनांची मीमांसा येथे गाडगिळांना विशेषेकरून अभिप्रेत आहे. त्यांनी आपली ही विचारधारा शक्य तितक्या सुसूत्रपणे स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला असला तरी तीतील धावतेपणामुळे हे विवेचन सम्यक्पणे आपला दृष्टिविषय होत नाही. अतिविस्तृत आणि अतिभव्य अशा एखाद्या वास्तूचे निरीक्षण एखाद्या दुसऱ्या घाई-गर्दीच्या प्रदक्षिणेने संपविण्यातला हा प्रकार वाटतो. एकेका स्वतंत्र ग्रंथाचा विषय गाडगिळांनी येथे कसातरी दाटीवाटीने एकेका व्याख्यानात बसविलेला आहे. 'प्राचीन व मध्ययुगीन धर्मकल्पना आणि मराठी संत' असा या व्याख्यानमालेचा विषय असला तरी प्रत्यक्षात मराठी संतांपेक्षा प्राचीन व मध्ययुगीन धर्मकल्पनांचा विचारच प्रस्तुत स्थळी अधिक प्रमाणात झालेला आढळतो. एकूण तीन व्याख्यानां-पैकी शेवटचे एकच व्याख्यान संतसाहित्याशी प्रत्यक्षपणे संबंधित आहे; प्रस्तुत स्थळी हे तिसरे व्याख्यानच विचारात घेण्याचे ठरविले आहे.

संतसाहित्याच्या विवेचनासाठी डॉ. गाडगिळांनी स्वीकारलेली मार्क्सप्रणीत ऐतिहासिक वस्तुवादी भूमिका मराठीत नवी नाही; ज्यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ ही व्याख्यानमाला आयोजित केली गेली आहे, त्या लालजी पेंडसेंनी या भूमिकेचा मराठीत प्रथमोच्चार केला. प्रा. गं. बा. सरदार, बा. रं. सुंठणकर प्रभृतींनी याच भूमिकेवरून पुढे संतसाहित्याचे मूल्यमापन केले, संतसाहित्याची सामाजिक राजकीय फलश्रुती स्पष्ट केली. पेंडसे-सुंठणकर यांच्या विवेचनात ही ऐतिहासिक वस्तुवादी दृष्टी काहीशा एकांगीपणे कार्यकर झाली आहे. सरदार आणि गाडगीळ यांच्या भूमिकेत सुदैवाने हे एकांगीपण नाही.*

..................

* "ऐतिहासिक वस्तुवादी मीमांसा ही कल्पना अतिशय सावधपणे हाताळावयास हवी. जीवनाच्या कोणत्याही क्षेत्रातील प्रत्येक घटनेमागे आर्थिक प्रेरणा दाखविता येते, असे या विचारप्रणालीला अभिप्रेत नाही. अत्यंत व्यापक अर्थाने फार मोठ्या काल-खंडाच्या संदर्भात आणि तेही सर्वसामान्यपणे सांस्कृतिक घटनांमागील भौतिक प्रेरणा दाखविता येतात. एखादा विचार, एखादे तत्त्वचिंतन, एखादी आध्यात्मिक संकल्पना अथवा एखादे ध्येयस्वप्न एकदा जन्माला आले की त्याच्या ठिकाणी स्वयंभू सामर्थ्य निर्माण होते." ('प्राचीन व मध्ययुगीन धर्मकल्पना आणि मराठी संत.' पृ.५)

या समानधर्मत्वामुळेच गाडगिळांनी प्रस्तुत पुस्तिकेसाठी प्रा. सरदारांची प्रस्तावना घेतलेली असावी.

प्राचीन आणि मध्ययुगात नव्याने पुनरुज्जीवित झालेला भक्तिविचार हा मूलतः सामाजिक – सांस्कृतिक परिवर्तनाचा आविष्कार आहे; संतांनी पुरस्कारिलेली भक्तीची चळवळ प्रारंभी तरी सामाजिक आणि सांस्कृतिक दास्यातून स्त्री-शूद्रांची मुक्तता घडवून आणण्याच्या प्रेरणेमधूनच फोफावली; त्या काळात धर्म हाच सामाजिक जीवनाचा मध्यबिंदू असल्यामुळे हे सारे विमोचनविचार 'भक्ति'कल्पनेशी संलग्न झाले, असे डॉ. गाडगीळ म्हणतात. भक्तिमार्ग हा यात्वात्मक कर्मकांडाच्या पाशातून माणसाला मुक्त करून खऱ्या धर्मभावनेला उद्युक्त करण्याचा एक उपक्रम होता. वैदिक आर्यांच्या मूळ यज्ञविधीशी या भक्तिकल्पनेचा सांधा जोडण्याचा जो प्रयत्न होतो, तो गाडगिळांच्या मते निखालस चुकीचा आहे. यज्ञविधीत मंत्रांच्या काटेकोर विधि-विधानांना कमालीचे महत्त्व असते, तर भक्तिमार्गात उपासकाच्या अंतःकरण-प्रवृत्तींना अग्रस्थान दिले जाते; गाडगिळांच्या मते यज्ञविधी आणि भक्तिमार्ग या संकल्पनाच एक प्रकारे परस्परविरोधी आहेत.

प्राचीन यज्ञविधी किंवा मध्ययुगीन कर्मकांडप्रधान धर्मधारणांच्या तुलनेने संतांचा भक्तिमार्ग हा अधिक उदार आणि विशाल होता यात शंका नाही. संतपूर्वकालीन समाजात विविध प्रकारच्या पारलौकिक धर्मकल्पनांच्या आश्रयाने माणसे नानाविध कर्मकांडांच्या मंत्र-तंत्रांच्या आधीन होऊन आपली ऐहिक जीवनयात्रा सुखी करण्याचा प्रयत्न करीत होती. अशा परिस्थितीत लोकजीवनाला एक नवी दिशा दाखविणारी संकल्पना संतांच्या भक्तिविचाराच्या रूपाने उदयास आली. या विचाराने जीवनामध्ये उदारमतवादाचे – मानवतावादाचे नवे युग प्रवर्तित केले. या युगप्रवर्तनालाही त्या युगाच्या अशा काही अंगभूत मर्यादा होत्या, हे येथे कटाक्षाने लक्षात घ्यावयास हवे. संतांना समाजजीवनामध्ये मूलभूत परिवर्तन घडवून आणणे शक्य नव्हते; उत्पादन-साधनांमध्ये मूलभूत परिवर्तन होऊन सामाजिक संबंध जेव्हा पूर्णतया बदलतात; तेव्हाच समाजाच्या जीवनात आमूलाग्र बदल होत असतो; असे ऐतिहासिक वस्तुवाद मानतो. तेराव्या शतकात महाराष्ट्रात झालेला बदल या स्वरूपाचा नव्हता. यामुळे संतकार्याच्या मर्यादाही ध्यानात येतात. संतांना चातुर्वर्ण्याची चौकट यामुळेच मोडणे शक्य नव्हते कारण ही चौकट तत्कालीन स्थिर अर्थव्यवस्थेशी निगडित होती. संतांनाच काय पण औद्योगिक संस्कृतिपूर्व कालात उदयाला आलेल्या कोणत्याही धर्मसंस्थापकाला या वर्णव्यवस्थेचे निर्मूलन करणे जमलेले नाही; ही वस्तुस्थिती लक्षात घेतल्यास वर्णव्यवस्था न मोडल्याबद्दल दलितांचे आजचे कैवारी संतांना बोल लावतात; तो कसा चुकीचा आहे, हे स्पष्ट होते. कोणत्याही मूलभूत भौतिक परिवर्तनाची शक्यता नसल्यामुळे धर्मकल्पनांमध्ये मूलगामी परिवर्तन घडवून आणणे हाच समाज

जिवंत ठेवण्याचा एकमेव मार्ग होता आणि संतांनी तोच अनुसरला, असे संतांच्या कार्याबद्दल डॉ. गाडगिळांचे प्रमुख प्रतिपादन आहे.

संतांच्या या कार्याबद्दल ते आणखी म्हणतात : संतांनी परमेश्वराच्या स्वरूपा-संबंधीच्या प्रचलित असलेल्या भ्रामक श्रद्धा आणि समजुती दूर केल्या. एकेश्वरवादाची कल्पना रुजविली. धार्मिक कर्मकांडाच्या नावे चालू असणारे अनाचार मोडून काढले. सर्वग्राह्य आणि सामाजिक दृष्ट्या नैतिक मूल्यावर अधिष्ठित अशा उपासनापद्धतीचा मार्ग दाखविला. कर्मसिद्धान्ताला बगल देऊन त्यातून येणारे मानसिक दास्य दूर केले. वास्तविक संतपूर्वकालातच भक्तिमार्ग उदयाला आलेला होता; परंतु या भक्तिमार्गाला विविध विकृतींनी पछाडलेले होते. संतांनी भक्तिमार्गाला जडलेली ही विकृती नाहीशी केली. कोणत्याही प्रकारची मूलभूत भौतिक आर्थिक क्रान्ती झालेली नसताना, केवळ सुधारणावादाच्या आश्रयाने संतांनी हे यश मिळविले. या यशात ज्ञानेश्वरांचा वाटा सर्वाधिक प्रमाणात आहे. सर्वांनीच या कर्तृत्वाचे श्रेय ज्ञानेश्वरांना दिले आहे. ज्ञानेश्वरांना हे जे यश मिळाले, त्याचे रहस्य गाडगिळांच्या मते, पुढील वस्तुस्थितीत आहे :

(१) भव्य आणि उदात्त मानवतावादाचे अधिष्ठान असलेले त्यांचे अद्वैत तत्त्वज्ञान, (२) लौकिक कर्मालाच भक्तीचे रूप देणारा त्यांचा भक्तिविचार, (३) दृश्य जग हे सत्य असल्याचा प्रत्यय देणारे त्यांचे चिद्विलासवादी तत्त्वज्ञान आणि (४) भक्तियोगालाच कर्मयोगाची जोड देऊन 'लोकसंख्या' रक्षणाकडे, लोकसंग्रहाकडे त्यांनी कटाक्षाने वेधलेले लक्ष.

ज्ञानेश्वरांच्या कर्तृत्वाचा विचार करताना, गाडगिळांनी या संबंधात समारोपादाखल पुढील गौरवोद्‌गार काढले आहेत :

"त्यांनी (ज्ञानेश्वरांनी) शंकराचार्यांचा अद्वैतवाद घेतला, पण विश्वाचे मिथ्यत्व अमान्य करून संन्यासवादाचा पायाच उखडून टाकला; वैष्णवांची साधी भक्तिपर साधना घेतली, पण तिला अद्वैतभक्तीचे निष्ठारूप देऊन क्रियात्मक कर्मकांडाचे बंड नाहीसे केले; नाथपंथाची बहुजनसमाजाबद्दलची करुणावृत्ती घेतली पण त्यांच्या हठयोगादी मार्गांचा त्याग करून सिद्धिप्राप्तीतील धोके टाळले आणि धर्मजीवनातील मंत्रतंत्रादी मार्गांचे महत्त्व नाहीसे केले. शैवांची शिव शक्ती उपासना घेतली, पण शिव आणि शक्ती यांचे अद्वैत कल्पून शक्तीचे स्वतंत्र अस्तित्वच नाहीसे करून टाकले; त्यांनी लावलेल्या या अद्वैत भक्तिवृक्षाला अत्यंत मधुर फळे आली; हाच त्यांच्या नवयुगप्रवर्तनाचा पुरावा होय" (पृ. १२१ – १२२)

ज्ञानेश्वरांच्या आणि पर्यायाने सर्वच संतांच्या कार्याची गाडगिळांनी ही वर्णिलेली महती सर्वश्रुतच आहे. असांप्रदायिक आणि सांप्रदायिक या साऱ्यांनीच आजवर या ना त्या प्रकारे संतांची गौरवगाथा आळविली आहे. ऐतिहासिक भौतिकवादी वस्तुनिष्ठ दृष्टिकोणातून विचार करणाऱ्या गाडगिळांसारख्या एका चिकित्सक

अभ्यासकाकडून हा गौरव केला गेला असल्यामुळे या गौरवाला एक वेगळे वजन प्राप्त होते; त्याचा अधिक मागोवा घ्यावा असे वाटू लागते.

संतांनी मुख्यतः आध्यात्मिक क्षेत्रातच क्रान्ती केली आणि त्या क्रान्तीचा अन्वयार्थ आध्यात्मिक संदर्भातच लावला पाहिजे हे उघड आहे; उच्च आध्यात्मिक किंवा नैतिक मूल्यांचा समाजमनावर काही अंशी परिणाम होत असतो, हेही मान्य करावयास हरकत नाही. धार्मिकतेच्या नावाखाली चाललेल्या काही घृणास्पद प्रकारांचे प्रस्थ संतांनी कमी करण्याचा प्रयत्न केला, याबद्दलही वाद नाही; समाजाबद्दल संतांना वाटणारी कळकळ आणि संतांच्या व्यक्तिगत जीवनातील शुद्धता यांचा एक प्रभाव त्या त्या काळात काही प्रमाणात निर्माण झाला; हेही सत्यच आहे. तथापि एक भौतिकतावादी इतिहासमीमांसक या नात्याने "संपूर्ण भारतीय धर्मजीवनाला नवे वळण लावणारा, लोकसंग्रह आणि सामाजिक नीतिमत्ता यावर भर देणारा, नव्या आशयाने संपन्न झालेला भक्तिमार्ग सुरू करून ज्ञानेश्वरादी संतांनी फार मोठे कार्य केले आहे." ( पृ ९९ ) असे जेव्हा डॉ. गाडगीळ म्हणतात तेव्हा विचार पडतो. संतांच्या ऐतिहासिक कार्याचा पुढिलांच्या सामाजिक जीवनात काय प्रभाव पडला ? जी 'लोकसंख्या' रक्षणीय आहे, असे ज्ञानेश्वर म्हणतात, त्या लोकसंख्येचे स्वरूप काय ? वारकरी संप्रदायामुळे ती गतिशील झाली की पूर्वी-प्रमाणेच स्थितिशीलच राहिली ? वारकरी संप्रदायामुळे बहुजनसमाजात खरोखर काही मूलभूत स्वरूपाचे मानसिक परिवर्तन घडून आले का ? वारकरी संप्रदायाच्या एकंदर वाटचालीत या समूहाशी या संप्रदायाने अर्थपूर्ण असा कितपत संवाद साधला ? असे किंवा यासारखे प्रश्न समोर उभे राहतात.

ज्ञानेश्वरादी संतांचे कर्तृत्व मोजण्याचा एक मानदंड म्हणून मग वारकरी संप्रदायाकडे साहजिकच लक्ष वेधते. गेली सातशे वर्षे अखंडपणे चाललेला हा संप्रदाय संख्यादृष्ट्या आणि परंपरादृष्ट्या आजही फार बलवान वाटतो साऱ्या भारतातच तो अनेक दृष्टींनी अपूर्व ठरलेला आहे. या पंथाने महाराष्ट्रापुरती तरी आध्यात्मिक लोकशाही स्थापन केली असे ठासून सांगण्यात येते. येथे कोणी कोणाच्या अधि-काराच्या दडपणाखाली नसतो. जो तो सहजपणेच एकमेकांशी बरोबरीच्या नात्याने वागतो; पण बेशिस्त मात्र होत नाही. परंपरेनेच या वारकरी मेळाव्याला आपोआप अशी एक शिरत प्राप्त झाली आहे; कोणीही न सांगता, न बोलावता, ठरलेल्या दिवशी, ठरलेल्या ठिकाणी, अनेक ठिकाणांहून माणसे गोळा होत असतात; भजन-पूजन करतात; येथे विठ्ठलाबद्दल विशेष प्रेम असले तरी इतर देवतांचा धिक्कार नाही; किंवा अमुक गोष्ट अमुक पद्धतीनेच केली पाहिजे असा आग्रहही नाही; सारे मुक्त मोकळे आणि तरीही सामूहिक पद्धतीने येथे साजरे होते. यात कोणीही, केव्हाही आणि कशाही पद्धतीने सहभागी व्हावे. भक्तिसुखाचा आनंद मुक्तपणे लुटावा. या

आनंदाच्या आड सोवळे-ओवळे, गरीब श्रीमंत, सुशिक्षित-अशिक्षित, स्पृश्य अस्पृश्य यासारखे व्यावहारिक भेदभाव मुळीच येत नाहीत. येथे सगळीकडे साऱ्यांना मुक्तद्वार आहे; यामुळेच हा पंथ राजकीय, सामाजिक, आर्थिक स्वरूपाच्या अनेक उलथापालथी होऊनही पूर्वीचाच जोमाने टिकून आहे. अशी भल्याभल्यांनी या संप्रदायाची भलावण केलेली आढळते.

वारकरी संप्रदाय गेली सातशे वर्षे अखंडपणे टिकून आहे, त्याची पाळेमुळे बाह्यतः तरी बहुजनसमाजापर्यंत भिडली आहेत; हे खरे आहे. एखादे विठ्ठलमंदिर, एखादा भजनाचा फड, एखादाही वारकरी नसलेले खेडे साऱ्या महाराष्ट्रात शोधूनही सापडणे कठीण. या संप्रदायात बाह्य अवडंबर नाही; सर्वांना सहजपणे आणि सोपेपणे अमलात आणता येतील, असेच या संप्रदायाचे नियम आहेत, हेही खरे आहे; प्रश्न आहे तो येथील ग्रामजीवनाला नैतिक वळण लावण्याच्या दृष्टीने या पंथाने आजवर काही कार्य केले का ? किंवा या पंथाच्या हातून तसे काही कार्य झाले का ? हा. या प्रश्नाला समूहाच्या संदर्भात तरी नकारात्मकच उत्तर द्यावे लागते. काही व्यक्तिजीवनावर या पंथाने काही शुभंकर संस्कार केले असतील पण 'संपूर्ण भारतीय धर्मजीवनाला' नवे वळण लावण्याची क्षमता यातून निर्माण झाली असे कितपत म्हणता येईल ! संतसाहित्याची महती वर्णन करताना येथे डॉ. गाडगीळ संतविषयक पारंपरिक गौरवभावनेने भारावून तर गेले नाहीत ना ?. अशी शंका येते. या पुस्तिकेचे प्रस्तावनाकार प्रा. सरदार हे या बाबतीत अधिक वास्तवपूर्ण भूमिका घेतात. संतकार्याच्या गौरवाबरोबरच संतकार्याला पडलेल्या मर्यादांचे भानही सरदारांनी ठेविले आहे. ते म्हणतात, "...काही थोड्या तीव्र संवेदनक्षम साधुसंतांना सामाजिक जीवनातील विषमता व जन्मसिद्ध उच्चनीच भाव यांची खत वाटली, तरी यामुळे असंख्य शूद्रातिशूद्रांच्या अंगवळणी पडलेली गुलामगिरीची वृत्ती नाहीशी झाली नाही. सामान्य जनांच्या जीवनाची चाकोरी तशीच पूर्ववत चालू राहिली. संत चळवळीमुळे निर्माण झालेले जागृतीचे व उत्साहाचे वातावरणही फार काळ टिकू शकले नाही. तुकारामानंतर महाराष्ट्रात बहुजनसमाजातून एकही श्रेष्ठ साहित्यिक उदयास आला नाही. सांस्कृतिक जीवनाची सूत्रे उच्चवर्णियांच्याच हाती राहिली. पुढे उत्तर पेशवाईत तर पुनरुज्जीवनवादाचे अतोनात प्रस्थ माजले." (प्रस्तावना, पृ. एकवीस )

"बाह्य परिस्थितीत आमूलाग्र परिवर्तन झाले नाही, तोपर्यंत बहुसंख्य लोकांना कालबाह्य झालेले आपले पूर्वसंस्कार टाकून देऊन नव्या जाणिवा आत्मसात करता येत नाहीत." ( प्रस्तावना, पृ. वीस ) असे या परिस्थितीचे कारणही प्रा. सरदार यांनी नमूद केले आहे; पण ही कारणमीमांसा तशी अपुरी वाटते. बाह्य परिस्थितीत ज्या प्रमाणात बदल होतो, त्या प्रमाणात समाजाच्या आंतरिक प्रवृत्तीत निश्चालस

बदल होत गेल्याचा दाखला नाही. बाह्य परिस्थितीच्या बदलाच्या प्रमाणात आंतरिक स्थित्यंतरे होत गेली असती तर विसाव्या शतकातील आजच्या घडीला जुनाट अंध-श्रद्धांनी वेढलेले लोक आपल्यात आढळले नसते. बाह्य परिस्थितीने प्रदान केलेली भौतिक साधने माणूस वापरतो, ती आध्यात्मिक उन्नयनासाठी नव्हे तर स्वतःच्या आधिभौतिक सुखस्वास्थ्यासाठी. आंतरिक स्वरूपाचे नैतिक परिवर्तन हे कोणत्याही काळात आणि कोणत्याही परिस्थितीत दुर्मिळच असते. नैतिक गुणांचे मूलभूत सौंदर्य जाणणारी आणि त्याचा स्वाभाविक स्वीकार करणारी माणसे समाजात नेहमीच अभावाने आढळणारी. या उन्नयनाला धर्मसंप्रदायांचा म्हणावा तसा उपयोग होत नाही; कोणतीही आणि कितीही उदात्त धर्मप्रणाली घेतली तरी अखेरीस तीत सांप्रदायिकता शिरल्याशिवाय राहात नाही; ही सांप्रदायिकता त्या धर्मतत्त्वातील मूळ चैतन्याला प्रेरक न ठरता मारकच ठरत आली आहे. जे नवे असते, त्याची सांप्रदायिकतेमुळे चाकोरी होते; जे मुळात चैतन्यशील असते, ते कालांतराने जडशील बनते. त्यातील कंद उपेक्षिला जाऊन त्याच्या कवचाचाच बडिवार माजतो. कोणत्याही धर्मपंथाची प्रतिज्ञा तशी विश्वात्मकच असते. पण तिची फलश्रुतीमात्र

व्यक्तिसापेक्षच राहते; विचारा वारकरी संप्रदाय तरी या साऱ्याला कुठून अपवाद असणार ?

याचा अर्थ, मूल्यभावांना जीवनात काहीच स्थान नसते असे नव्हे; उच्च उदात्त मूल्यांच्या ठिकाणी एक अंगभूतच आकर्षण असते; या आकर्षणाने त्या मूल्याकडे सारेच आकृष्ट होतात; पण हे आकर्षण सातत्याने टिकून मात्र राहात नाही; टिकून राहते ती सांप्रदायिकता; या सांप्रदायिकतेचा आंतरिक परिवर्तनाला फारसा उपयोग नसतो; या परिवर्तनाच्या दृष्टीने या धर्मतत्त्वातील काव्यात्मक कंद अधिक साहाय्यभूत होणारा. हे साहाय्य वाचाळ नसून मूक असते; वारकरी संप्रदायातील टाळगजर फक्त गुंगी आणतात. पण संतसाहित्यातील सहजपणे कानावर येणारी एखादी ओळही अंतर्मुख बनविते, आपल्या ठिकाणी राहूनच आपल्या अंगभूत गुणाने ती संवेदनशील मनाला आकृष्ट करते; या दृष्टीने धर्मप्रणालीपेक्षा या धर्मप्रणालीतून जन्माला आलेल्या कलाकृती अंतिमतः समाजमनाच्या दृष्टीनेही अधिक महत्त्वाच्या ठरतात.

त्या त्या धर्मप्रणालीचे सारे सुंदर संचित रसार्द्रपणे त्या त्या कलाकृतीत समाविष्ट झालेले असते. धर्मसंस्थांना उदयास्त असतो; पण या निमित्ताने संभवलेल्या श्रेष्ठ कलाकृती मात्र अमर राहतात. या दृष्टीने विचार करता संतांचे साहित्य हे संतांच्या पंथ-प्रणालीपेक्षा अधिक महत्त्वाचे ठरते. एक प्रकारे या साहित्यानेच या पंथाला श्रेष्ठपण प्राप्त करून दिले आहे. महानुभाव पंथात अनेक पंडित, कार्यकर्ते, कवी निर्माण झाले, पण त्यात ज्ञानेश्वर–तुकारामाच्या तोलामोलाचा ग्रंथकार निर्माण झाला नाही; महानुभाव पंथ क्षीणप्रभ होण्याचे हेही एक कारण आहेच.

श्रेष्ठ-साहित्य– मग ते कोणत्या का पंथप्रणालीच्या निमित्ताने जन्माला येवो– ते त्या पंथापुरते सीमित राहात नाही; त्याचा सुगंध सर्वत्र आणि सर्वकाळ पसरतो; अक्षर साहित्याची महती यातच आहे. विशिष्ट पंथापेक्षा त्या पंथाने निर्माण केलेले श्रेष्ठ साहित्यच त्या त्या समाजाच्या वैचारिक जडणघडणीवर, मूल्यविषयक जाणिवेवर, भाषिक व्यवहारावर कळत न कळत विविध संस्कार करीत राहते. हे साहित्य त्या समाजातील साऱ्या व्यक्तींच्या प्रत्यक्ष अवलोकनाचा विषय नसतेही. या साहित्याचा साक्षात परिचय असणारेही तसे फारच थोडे असतात आणि या साहित्याचा चोखदळपणे अभ्यास करणारे तर त्याहूनही दुर्मिळ. प्रत्यक्षात तसे पाहिले तर या साहित्याला दैनंदिन व्यवहाराच्या दृष्टीने एक प्रकारचे दूरत्व, धूसरत्व प्राप्त झालेले असते, पण परोक्षपणे व्यक्ती समाजमनावर ते सातत्याने या ना त्या प्रकारचे संस्कार करीतच राहते. त्याच्या दूरस्तपणातूनही जवळिकेचा एक आश्वासक सूर उमटत असतो. विविध प्रकारच्या भावभावनांचे, विचारकल्पनांचे संतर्पण, संतुलन, विवेचन, उन्नयन प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे अशा साहित्यातून घडत असते. रामायण–महाभारत ही या प्रकारच्या साहित्याची ठळक उदाहरणे. अशा साहित्यातून वेगवेगळ्या काळात

वेगवेगळे अन्वयार्थ काढले जातात आणि ते सारे सामावून घेण्याची क्षमताही अशा साहित्यात असते. हे साहित्य जितके सार्वकालिक असते तितके समकालीनही. ज्ञानेश्वर-तुकारामांचे साहित्य हे या प्रकारचे साहित्य आहे. या दोन संतांचे प्रमुख कार्य त्यांच्या सौंदर्यपूर्ण साहित्यनिर्मितीत सामावलेले आहे. या दोनही ग्रंथकारांच्या नावाचा उद्घोष वारकरीपंथात अखंडपणे चालू असतो; पण त्या मानाने पंथियांकडून त्यांच्या ग्रंथांचा आस्वाद रसिकपणे क्वचितच घेतला जाणारा. पंथीय अभ्यासात वर्चस्व आहे ते पारंपरिकतेचे-सांप्रदायिकतेचे. वारकरी संप्रदायातील अविद्वानाप्रमाणे विद्वानही या पारंपरिकतेचीच री ओढताना दिसतात. या अभ्यासात जसजशी असांप्रदायिकता येत राहील, तसतसे या संप्रदायाचे सांस्कृतिक वैभवही अधिकाधिक उजळून निघण्याची शक्यता आहे.

याचा अर्थ संतविषयक अभ्यासात इतर ज्ञानशाखांच्या द्वारांना टाळेच लावावे असा नाही. प्रत्येक ज्ञानशाखा आपापल्या परीने अभ्यासविषयाच्या रहस्यभेदास सहायकच होत असते; प्रत्येक शाखेला तिचे असे एक बळ असते, तशी मर्यादाही. सामाजिक-सांस्कृतिक अंगाने किंवा डॉ. स. रा. गाडगीळ यांनी प्रस्तुत व्याख्यानांतून मांडलेल्या ऐतिहासिक वस्तुवादी दृष्टिकोणाने संतमंडळांच्या कर्तृत्वाचे काही पैलू निःसंशयपणे प्रकाशित होतात; या दिशेने अधिक अभ्यास होण्याची नितांत गरजही जाणवते. पण आजवरच्या संतविषयक अभ्यासाला ही सामाजिक-सांस्कृतिक विचारांची जी एकच एक दिशा लागली आहे; ती तेवढी इष्ट नाही. संतसाहित्याच्या अभ्यासालाही हे एकदेशीपण चिकटून राहिले आहे ते थोडे दूर व्हावे, त्याचे पदर थोडे मोकळे व्हावेत म्हणून प्रस्तुत पुस्तिकेतील विवेचनाला हा साहित्यविचाराचा फाटा फोडावासा वाटला.

**डॉ. स. रा. गाडगीळ**

(प्रकाशन : लोकवाङ्मयगृह प्रा. लि.)

मूल्य सोळा रुपये, पृष्ठसंख्या १२२

# महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे–३०.
## वार्षिक साधारण सभा

### सूचना

दि. ५ जून १९७९

स. न. वि. वि.

म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार, दि. २४ जून १९७९ रोजी पुणे येथे परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात सायंकाळी ठीक पाच वाजता भरणार आहे. सभासदांनी या सभेला अवश्य यावे ही विनंती.

**सभेपुढील कामे :**

१. श्रद्धांजली.
२. मागील सभेचा वृत्तान्त वाचून संमत करणे.
३. १९७८–७९ चा कार्यवृत्तान्त संमत करणे.
४. १९७८–७९ चे उत्पन्न-खर्च आणि ताळेबंद-पत्रक संमत करणे.
५. १९७९–८० चा अर्थसंकल्प संमत करणे.
६. हिशेबतपासनिसांची नियुक्ती करणे.
७. पत्रव्यवहार.
८. अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळची कामे.

आपले

**म. श्री. दीक्षित**
**माधव कानिटकर**
**द. ता. भोसले**
कार्यवाह

**पु. शं. पतके**
कोषाध्यक्ष

**वसंत कानेटकर**
अध्यक्ष
**वि. रा. करन्दीकर**
कार्याध्यक्ष

कोणाही सभासदास कार्यवृत्त अथवा हिशेब यासंबंधी काही माहिती हवी असेल अथवा ठराव पाठवावयाचा असेल, तर तसे लेखी स्वरूपात, सभेपूर्वी सात दिवस कळवावे ही विनंती.

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद, पुणे ३०

## १९७८-७९ चे कार्यवृत्त

परिषदेच्या मागील कार्यकारी मंडळाच्या शेवटल्या—तिसऱ्या वर्षातील कार्याचे वृत्त सादर करीत आहोत.

**सभासद-संख्या :**

| वर्ग | वर्षारंभी | वर्षअखेर |
|---|---|---|
| उपकर्ते | २ | १ |
| आश्रयदाते | ७ | ६ |
| सहायक | २१ | २० |
| हितचिंतक | २२ | २२ |
| आजीव | ८८४ | ९५० |
| वार्षिक ( साधारण ) | १७७४ | १९४४ |
| | २७१० | २९४३ |

निधन पावलेल्या व कमी झालेल्या सभासदांची घट वजा जाता वर्षअखेरची ही संख्या आहे. ७८–७९ या वर्षात प्रत्यक्षात आजीव ७३ आणि वार्षिक १७० असे एकूण सभासद नवीन झाले. आजीव सभासदांच्या वर्गणीची रक्कम गतवर्षाप्रमाणेच विश्वस्तांकडील स्थिरनिधीत गुंतविली आहे. शाखासभांनी ( विशेषतः सोलापूर, धुळे आणि सातारा ) चांगले सहकार्य दिल्यामुळे वार्षिक सभासद-संख्येतही बरीच भर पडल्याचे दिसून येईल. गेल्या दोन वर्षाप्रमाणेच याही वर्षात स्थानिक पदाधिकाऱ्यांच्या प्रयत्नांमुळे ७३ नवीन आजीव सभासद परिषदेस लाभले.

**साहित्य-पत्रिका :**

या वर्षात डॉ. हेमंत इनामदार यांच्या संपादकत्वाने म. सा. 'पत्रिके'चे जून, डिसेंबर, मार्च ( ७९ ) असे तीन अंक प्रकाशित झाले. जानेवारी ते जून जोड

अनुक्रमणिका

अंक १४४ पृष्ठे, जुलै ते डिसेंबर जोड अंक पृष्ठे १४४, जानेवारी ते मार्च अंक पृष्ठे ८५ मिळून एकूण सुमारे ३७३ पृष्ठांचा मजकूर पुरविण्यात आला. गतवर्षापेक्षा सुमारे १०० पृष्ठे या वर्षात अधिक देण्यात आली. सरकारी कागद न मिळाल्याने दुपटीने वाढलेल्या दराने कागद खरेदी करावा लागल्याने पत्रिकेचा खर्च कल्पनेपेक्षा अधिकच वाढला गेला. सभासदत्वाच्या वार्षिक १० रुपये वर्गणीत अंक देणे कठीण होत चालले आहे. परंतु परिषद आणि सभासद यांचे नाते जोडणारे 'पत्रिका' हे एकमेव माध्यम असल्याने परिषद आर्थिक झीज सोसूनही हे त्रैमासिक सातत्याने चालवीत आहे.

## कै. वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालय :

वर्षारंभी ग्रंथालयातील ग्रंथसंख्या १८३६९ होती. चालू वर्षात नवीन खरेदी अभिप्रायार्थ आणि भेटीदाखल आलेले ग्रंथ मिळून ५३७ ग्रंथांची भर पडली. मार्चअखेर एकूण ग्रंथसंख्या १८९०६ झाली आहे. सर्वश्री पां. र. अंबिके, वि. ग. कानिटकर, श्री. गो. फणसळकर, वि. सी. गोडबोले, कै. कृष्णराव मराठे यांच्या स्नुषा, ज्योत्स्ना भोळे, भीमराव कुळकर्णी तसेच केसरी-मराठा संस्था यांनी सुमा ३०० पुस्तके व मासिक पुस्तके ग्रंथालयास भेटीदाखल दिली. या सर्वांची परिषद ऋणी आहे. ललित स्वरूपाची पुस्तके घरी देण्याचा उपक्रम मर्यादित स्वरूपात या वर्षीही चालू होताच. या वर्षी नवीन सदस्य नोंदविणे आर्थिक व व्यवस्थापनाच्या दृष्टीने अडचणीचे झाल्याने नाइलाजास्तव स्थगित करावे लागले. सांप्रत २५० सदस्य या योजनेचा लाभ घेत आहेत. ग्रंथालयात बसून सकाळ-संध्याकाळ संशोधन व संदर्भ साहाय्य घेणाऱ्या अभ्यासकांची संख्या सरासरी सुमारे २५ ते ३० असते. विद्यापीठ स्तरावरील विद्यार्थी, प्राध्यापक आणि जिज्ञासू वाचक यांना ग्रंथालयाचा जास्तीत जास्त उपयोग करून दिला जातो.

## संशोधन विभाग :

संशोधन विभागातर्फे डॉ. वसंत स. जोशी यांचे संपादकत्वाखाली 'भाषा व साहित्य : संशोधन पद्धती' हा ग्रंथ तयार झाला आहे. साहित्य संस्कृती मंडळाकडे अनुदानार्थ तो सादर करण्यात आला आहे. मंडळाकडून संमती व अनुदान मंजूर होताच तो प्रसिद्ध करण्यात येईल.

दि. ४ व ५ मार्च १९७९ रोजी संशोधन विभागातर्फे अहमदनगर जिल्हा ऐतिहासिक वस्तुसंग्रहालयाच्या सहकार्याने 'श्रीसंत एकनाथ आणि त्यांचा काळ' या विषयावर एक व्याख्यानमाला अहमदनगरला आयोजित केली होती. डॉ. वसंत स. जोशी यांनी मालेचे उद्घाटन केले. या मालेत 'एकनाथांच्या लेखनामागील

प्रेरणांचे स्वरूप '–डॉ. यू. म. पठाण, ' एकनाथ आणि मुक्तेश्वर यांचा वैयक्तिक व वाङ्मयीन संबंध '–प्रा. पां. ना. कुलकर्णी, ' एकनाथकालीन खिस्ती वाङ्मय व त्याचा समकालीन वाङ्मयाशी अनुबंध '–डॉ. स. गं. मालशे यांची भाषणे झाली. प्रि. डॉ. ह. कि. तोडमल यांनी मालेचा समारोप केला.

## वाङ्मयेतिहास योजना :

वाङ्मयेतिहास खंड १ चे संपादन डॉ. हेमंत इनामदार करीत असून खंडाचे कार्य प्रगतिपथावर आहे. खंड २ ( डॉ. स. गं. मालशे-संपादित ) तयार झाला आहे. साहित्य संस्कृति मंडळाच्या मान्यतेनंतर खंडाच्या छपाईस प्रारंभ होईल. सुमारे सहा महिन्यांत खंड छापून सिद्ध होईल असा अंदाज आहे. खंड ६ ( १९२१ ते १९७५ )-चा आराखडा, संपादन आणि लेखकांची निवड या बाबी नवीन कार्यकारी मंडळाकडे सोपविण्यात आल्या आहेत.

## स्मृतिदिन :

परिषदेतर्फे दरवर्षी काही स्मृतिदिन पाळले जातात. प्रथेनुसार १० एप्रिलला ज्ञानकोशकार कै. डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांच्या स्मृतिदिनी सकाळी कमला नेहरू उद्यानातील डॉक्टरांच्या स्मारकास डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांच्या हस्ते पुष्पहार घालून श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. सायंकाळी परिषदेच्या पटवर्धन सभागृहात डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांचे ' स्वातंत्र्योत्तर पुणे शहर : एक सामाजिक चिंतन ' या विषयावर अभ्यासपूर्ण व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी परिषदेचे अध्यक्ष प्रा. गं. बा. सरदार हे होते.

दि. १३ एप्रिल ७८ रोजी कै. भवानराव पंतप्रतिनिधी यांचा स्मृतिदिन साजरा करण्यात आला. या प्रसंगी श्री. पां. र. अंबिके यांच्या अध्यक्षतेखाली श्री. रा. ता. फडणीस यांचे ' श्रीमंत योगी ' या विषयावर भाषण झाले.

दलितांचे थोर नेते, विचारवंत, घटनाशिल्पकार कै. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची जयंती दि. १४ एप्रिल ' टिळक स्मारक मंदिर ' सभागृहात साजरी करण्यात आली. या प्रसंगी डॉ. बाबासाहेब आंबेडकर व कै. शाहीर अण्णाभाऊ साठे यांच्या छायाचित्रांचे अनावरण श्री. बाबूराव बागूल यांच्या हस्ते करण्यात आले यानंतर ' पत्रकार डॉ. आंबेडकर ' या विषयावर श्री. बागूल यांचे प्रा. गं. बा. सरदार यांच्या अध्यक्षतेखाली अभ्यासपूर्ण व्याख्यान झाले. कै. अण्णाभाऊंच्या वाङ्मयसंपदेची डॉ. भालचंद्र फडके यांनी श्रोत्यांना सर्वांगीण ओळख करून दिली. समाजपरिवर्तन संस्थेतर्फे श्री. विलास वाघ यांच्यामार्फत कै. अण्णाभाऊंचे छायाचित्र परिषदेला भेट म्हणून देण्यात आले.

२० जुलै हा कै. वामन मल्हार जोशी यांचा स्मृतिदिन. या दिवशी धारवाडचे प्रा. डॉ. पंडित आवळीकर यांचे 'तौलनिक वाङ्मयाभ्यास : काही विचार' य विषयावर व्याख्यान झाले.

ख्यातनाम कादंबरीकार नाथमाधव यांची पन्नासावी पुण्यतिथी म. सा. परिषद आणि दैवज्ञविकास या संस्थांच्या वतीने संयुक्तपणे साजरी करण्यात आली. श्री. विनायक देवरुखकर यांच्या कै. नाथमाधवांच्या जीवनचरित्रासंबंधीच्या छोट्याशा भाषणानंतर प्रमुख वक्त्या डॉ. सौ. चारुशीला गुप्ते यांचे 'नाथमाधवांची कादंबरी' या विषयावर व्याख्यान झाले. मुंबई येथील नाथमाधव स्मारक समितीतर्फे परिषदेकडे दीड हजार रुपये या प्रसंगी देण्यात आले. या रकमेच्या व्याजातून दरवर्षी कै. नाथमाधव यांचा स्मृतिदिन साजरा करावयाचा आहे. श्री. विनायक देवरुखकर, श्री. ना. धों. वैद्य व मुंबईचे ॲडव्होकेट दामोदर वगळ यांच्या प्रयत्नांमुळे ही देणगी परिषदेस मिळाली आहे.

संदेशकार कै. अच्युत बळवंत कोल्हटकर यांचे चिरंजीव श्री. कुसुमाकर कोल्हटकर यांनी वडिलांचे छायाचित्र १ ऑगस्टला परिषदेस भेट म्हणून दिले. श्री. प्रभाकर पाध्ये यांच्या हस्ते छायाचित्राचे अनावरण झाले. नंतर त्यांनी अच्युतरावांचे व्यक्तित्व आणि वाङ्मय यासंबंधी हृद्य आठवणी सांगितल्या. या कार्यक्रमानंतर १९७८ चे 'काळकर्ते शिवरामपंत परांजपे ग्रंथपारितोषिक' डॉ. रा. चिं. ढेरे यांना मिळाल्या-बद्दल त्यांचा सत्कार करण्यात आला. श्री. नी. स. तथा बाळासाहेब गोखले यांनी दिलेल्या देणगीतून प्रस्तुतचे पारितोषिक प्रतिवर्षांच्या उत्कृष्ट गद्य ग्रंथास देण्यात येणार आहे. या पारितोषिकाचा पहिला मान डॉ. रा. चिं. ढेरे यांना मिळाला.

महाराष्ट्र-भाषाभूषण कै. ज. र. आजगावकर यांच्या जन्मशताब्दीनिमित्त दि. २० ऑगस्ट रोजी डॉ. हेमंत वि. इनामदार यांचे 'आजगावकरांची साहित्यसेवा' या विषयावर प्रा. ग. बा. सरदार यांच्या अध्यक्षतेखाली अभ्यासपूर्ण व्याख्यान झाले.

खिस्ती साहित्यिक संघ आणि परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने खिस्तवासी बाबा पदमनजी यांचा बहात्तरावा स्मृतिदिन दि. २९ ऑगस्ट रोजी साजरा करण्यात आला. खिस्ती साहित्यिक संघाने परिषदेला बाबा पदमनजी यांचे छायाचित्र भेटी-दाखल दिले. श्रीमती विजया पुणेकर व श्री. बी. डी. काळे यांनी खिस्ती सा. संघाच्या कार्यासंबंधी निवेदन केल्यावर प्रा. डॉ. के. सी. कराडकर (अहमदनगर) यांचे 'बाबा पदमनजी : व्यक्ती आणि वाङ्मय' या विषयावर व्याख्यान झाले. प्रा. गं. बा. सरदार यांचे समारोपाचे भाषण झाल्यावर हा हृद्य कार्यक्रम संपला.

महर्षी टॉलस्टॉय यांची दीडशेवी जयंती दि. ९ व १० सप्टेंबर रोजी परिषदेने विशेष प्रकारे साजरी केली. दि. ९ रोजी प्रा. सौ. सुमती देवस्थळे यांचे 'टॉलस्टॉय : व्यक्ती आणि वाङ्मय' आणि दि. १० रोजी प्राचार्य न. शं. जमदग्नी यांचे

'वॉर अँड पीस' यावर व्याख्याने झाली. याप्रसंगी अनुक्रमे प्रा. अ. के. भागवत व प्रा. एम्. जी. देसाई हे अध्यक्ष होते.

दि. २८ नोव्हेंबर रोजी पुण्यातील 'महात्मा जोतिबा फुले' मंडळाच्या सहकार्याने परिषदेत म. फुले यांची पुण्यतिथी साजरी झाली. म. फुले मंडळाने दिलेल्या म. फुले यांच्या तैलचित्राचे अनावरण पुणे विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. राम ताकवले यांच्या हस्ते झाले. या प्रसंगी सर्वश्री ना. स. फरांदे, डॉ. राम ताकवले व अध्यक्ष प्रा. गं. बा. सरदार यांची विचारप्रवर्तक भाषणे झाली. श्री. गो. मा. डोमाळे यांनी म. फुले मंडळाचे वतीने आभारप्रदर्शन केले.

**माधव जूलियन स्मृतिदिन :** दि. २९ नोव्हेंबर रोजी थोड्या वेगळ्या पद्धतीने हा दिन साजरा करण्यात आला. डॉ. द. न. गोखलेकृत 'डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन' या चरित्रग्रंथावर लेखकाच्या उपस्थितीत प्रकट चर्चा झाली. श्री. मो. रा. वाळंबे, श्री. गोपीनाथ तळवलकर, डॉ. अनुराधा पोतदार, डॉ. प्र. न. जोशी, प्रा. स. शि. भावे यांनी चर्चेत भाग घेतला. लेखकाच्या स्वतःच्या भूमिकेतून डॉ. गोखले यांनी चर्चेतून निघालेल्या प्रश्नांची उत्तरे दिली.

कै. प्रा. रा. श्री. जोग यांचा स्मृतिदिन १७ फेब्रुवारी १९७९ रोजी कै. जोग स्मारक समितीच्या सहकार्याने व्हीनस प्रकाशन संस्थेच्या आवारात करण्यात आला. दोन्ही संस्थांच्या वतीने परिषदेचे उपाध्यक्ष डॉ. वि. रा. करंदीकर यांनी प्रास्ताविक भाषण केल्यावर प्रा. गो. म. कुलकर्णी यांचे 'संतसाहित्य आणि आधुनिक समीक्षा' या विषयावर भाषण झाले. परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. ज. जोशी यांनी आभार मानले.

कै. अमर शेख यांच्या छायाचित्राचे अनावरण दि. ४ मार्च रोजी परिषदेत झाले. सुप्रसिद्ध कवी श्री. नारायण सुर्वे यांचे 'अमर शेख : कार्य आणि कवित्व' या विषयावर भाषण झाले. अध्यक्ष प्रा. गं. बा. सरदार यांच्या समयोचित समारोपानंतर कार्यवाह श्री. म. श्री. दीक्षित यांनी आभारप्रदर्शन केले.

मराठीतील एक पुरोगामी लेखक आणि समाजकार्यकर्ते कै. हमीद दलवाई यांच्या छायाचित्राचे अनावरण दि. २२ मार्च रोजी परिषदेचे अध्यक्ष प्रा. गं. बा. सरदार यांच्या हस्ते झाले. सर्वश्री. वि. ग. कानिटकर, बाबा आढाव, सय्यदभाई, अनिल अवचट यांची भाषणे झाली. कार्याध्यक्ष श्री. श्री. ज जोशी यांनी आभार मानले.

जुन्या पिढीतील खंदे लेखक-संपादक कै. विनायक कोंडदेव ओक यांच्या स्मृत्यर्थ दि १९ मार्च रोजी सौ. लीलावती भागवत यांचे 'बालवाङ्मय आणि मुले' या विषयावर भाषण झाले. कै. ओक यांचे पणतू श्री. अनंतराव ओक यांनी परिषदेकडे ठेवलेल्या निधीच्या व्याजातून हा स्मृतिदिन परिषद दरवर्षी साजरा करीत असते.

**नवे उपक्रम :**

गेल्या दोन वर्षांपासून काही जुन्या मौलिक ग्रंथांचा परिचय करून देणाऱ्या 'नवरात्र व्याख्यानमाले'चे यंदाचे तिसरे वर्ष होते. ३ ऑक्टोबर ते १० ऑक्टोबर अखेर व्याख्यानमालेचे सत्र चालले. सत्राचे उद्घाटन प्रख्यात उद्योगपती श्री. म. स. ऊर्फ बाबूरावजी पारखे यांनी केले. समारोप विजयादशमीस सकाळी डॉ. मो. वा. तथा वसंतराव पटवर्धन (संचालक, बँक ऑफ महाराष्ट्र) यांच्या हस्ते ग्रंथपूजन होऊन झाला.

व्याख्यानांचा कार्यक्रम पुढीलप्रमाणे—

| | दिनांक | वक्ते | विषय |
|---|---|---|---|
| १. | ३–१०–७८ | प्रा. डॉ. यशवंत पाठक (मनमाड) | चरित्रचंद्र आणि आनच्या आयुष्यातील आठवणी |
| २. | ४–१०–७८ | प्रा. मा. ना. आचार्य (अलिबाग) | दुर्दैवी रंगू |
| ३. | ५–१०–७८ | प्रा. माधव वझे (पुणे) | दिवाकरांच्या नाट्यछटा |
| ४. | ६–१०–७८ | श्री. वि. आ. बुवा (कल्याण) | संपूर्ण बाळकराम |
| ५. | ७–१०–७८ | प्रा. सौ. पुष्पा भावे (मुंबई) | कळ्यांचे निःश्वास |
| ६. | ९–१०–७८ | डॉ. ल. रा. नसिराबादकर (कोल्हापूर) | उपेक्षितांचे अंतरंग |
| ७. | १०–१०–७८ | प्रा. स. शि. भावे (पुणे) | आंधळ्यांची शाळा |

अभिप्राय या नव्या उपक्रमात या वर्षी पुढील टिपणे वाचली गेली.

दि. २३ एप्रिल रोजी 'बॅरिस्टर' (ले. जयवंत दळवी) नाटकावर प्राचार्य म. द. हातकणंगलेकर, दि. २८ जून रोजी 'जनांचा प्रवाहो चालिला' (विनय हर्डीकर) या पुस्तकावर श्री. वि. ग. कानिटकर, दि. २८ जुलै रोजी 'उत्थानगुंफा' (प्रा. यशवंत मनोहर) या काव्यसंग्रहावर प्रा. आनंद यादव, दि. २६ ऑगस्ट रोजी 'मातृका' (पु. शि. रेगे) या कादंबरीवर प्रा. सौ. लीला अर्जुनवाडकर, दि ४ फेब्रुवारी रोजी 'सफर' (मोहन धारिया) या राजकीय आत्मचरित्रावर प्रा. ग. प्र. प्रधान.

या वर्षात 'अभिप्राय'तर्फे एकूण पाच ग्रंथांवर चर्चा झाल्या. डॉ. वि. भा. देशपांडे यांनी संयोजकाचे काम आस्थेवाईकपणे पार पाडले.

**व्याख्यानादी कार्यक्रम :**

**संमेलन शताब्दी :** मराठी साहित्य संमेलनाच्या स्थापनेला ११ मे रोजी शंभर वर्षे

पूर्ण झाली. या निमित्ताने परिषदेने विशेष कार्यक्रम आयोजित केले होते.

दि. ११ मे रोजी बालगंधर्व रंगमंदिर-कलादालनात चित्रकार श्री. म. वि. सोवनी यांच्या 'इये मराठीचिये नगरी' या प्रदर्शनाचे उद्घाटन श्री. गो. नी. दांडेकर यांच्या हस्ते झाले. अध्यक्षस्थानी प्रा. गं. बा. सरदार होते. या प्रसंगी श्री. दांडेकर यांचे भाषण झाले. चित्रकार श्री. सोवनी यांचा सत्कार करण्यात आला.

दुसरा कार्यक्रम २१ मे रोजी टिळक स्मारक मंदिराच्या चर्चा-सभागृहात झाला. या दिवशी दोन परिसंवाद झाले. सकाळी 'स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी समीक्षा' या परिसंवादाचा उपन्यास श्री. प्रभाकर पाध्ये, यांनी केला. प्रा. स. शि. भावे, प्रा. गो. म. कुलकर्णी, डॉ. भालचंद्र फडके, डॉ. स. गं. मालशे, प्रा. कृ. व. निकुम्ब, डॉ. आनंद यादव, व श्री. सुधीर बेडेकर यांनी परिसंवादात आपापले विचार मांडले.

दुपारच्या दुसऱ्या सत्राच्या 'साहित्य, समाज आणि शासन' या परिसंवादाचा उपन्यास तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी केला. प्रा म. ना. अदवंत, डॉ. वि. रा. करंदीकर, डॉ. निर्मलकुमार फडकुले, श्री. स. मा. गर्गे इत्यादींनी चर्चेत भाग घेतला. दोन्ही परिसंवादांचे अध्यक्ष प्रा. गं. बा. सरदार होते. प्रास्ताविक व स्वागत कार्याध्यक्ष श्री. श्री. ज. जोशी यांनी व आभारप्रदर्शन प्रा. न. म. जोशी व डॉ हेमंत इनामदार यांनी केले.

**कवितावाचन :** दि. १९ मे रोजी प्रा. यशवंत मनोहर, श्री. नारायण सुर्वे, श्री. बाबूराव बागूल आणि श्री. वामन निंबाळकर यांनी आपल्या निवडक कवितांचे जोषपूर्ण व बहारदार वाचन केले.

दि. ३ जुलै रोजी सोलापूरचे कवि श्री. राजा मंगसुळीकर यांचे गीतगायन झाले.

कन्नड साहित्य संमेलनाचे सुवर्ण महोत्सवी अधिवेशन दिल्ली येथे एप्रिलच्या शेवटच्या आठवड्यात झाले. परिषदेतर्फे अधिवेशनास प्रा. अ. रा. तोरो (वारणानगर) उपस्थित होते. आंतर-भारतीच्या एका परिसंवादात 'कन्नड-मराठी संबंध' या विषयावर डॉ. पंडित आवळीकर यांचे इंग्रजीतून भाषण झाले.

पुणे येथे डेक्कन कॉलेजतर्फे एक भाषांतर-सत्र (मार्च १९७९) आयोजित करण्यात आले होते. या सत्रात परिषदेतर्फे प्रा. अ. के. भागवत यांनी प्रतिनिधित्व केले.

दि. ५ व ६ ऑगस्ट रोजी ज्ञानेश्वरीचे एक अभ्यासक श्री. स. शं. गोडबोले यांची 'मी लावलेला ज्ञानेश्वरीच्या ओव्यांचा अर्थ' या विषयावर दोन व्याख्याने झाली. श्री. वि. त्र्यं. शेटे आणि डॉ. वि. रा. करंदीकर हे या प्रसंगी अध्यक्ष होते.

## भेटीगाठी, सत्कार इत्यादी :

१७ जून रोजी कन्नड कादंबरीकार व समीक्षक प्रा. व्ही. एम्. इनामदार यांच्या-

समवेत साहित्यिक गप्पागोष्टींचा कार्यक्रम झाला. कन्नड साहित्यातील जुन्या-नव्या प्रवाहांची माहिती प्रा. इनामदार यांनी करून दिली.

३० जुलै रोजी रत्नागिरीच्या आमदार सौ. कुसुम अभ्यंकर (लोकप्रिय कादंबरी-कर्त्या) यांच्या प्रकट मुलाखतीचा कार्यक्रम आयोजित केला होता. प्रा. न. म. जोशी व सौ. शैलजा राजे यांनी मुलाखतीचे संचालन केले.

'नॅशनल बुक ट्रस्ट' व 'मराठी प्रकाशक परिषद' यांच्या तर्फे आयोजित केलेल्या चर्चासत्रानिमित्त उपस्थित असलेल्या प्रतिनिधींना परिषदेतर्फे ३१ जुलै रोजी भेटीदाखल निमंत्रित केले होते. दोन्ही संस्थांच्या पदाधिकाऱ्यांचा या प्रसंगी सत्कार करण्यात आला.

परिषदेचे एक ज्येष्ठ आजीव सभासद व केसरी–तरुण भारत पत्रांचे निवृत्त संपादक श्री. ग. वि. केतकर यांच्या ऐंशीव्या वाढदिवशी त्यांचा पुष्पहार घालून सत्कार करण्यात आला.

परिषदेचे अध्यक्ष प्रा. गं. बा. सरदार व विश्वस्त श्री. वि. र्‍यं. शेटे यांनी एक्काहत्तराव्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल शुभेच्छा व्यक्त करण्यासाठी दि. २ ऑक्टोबर रोजी निमंत्रितांच्या उपस्थितीत उभयतांचा सत्कार करण्यात आला. या प्रसंगी, प्रा. दे. द. वाडेकर, श्री श्री. ज. जोशी व प्रा. ह. श्री. शेणोलीकर यांची भाषणे झाली.

ज्ञानपीठ पारितोषिक विजेते विख्यात कन्नड साहित्यिक श्री. शिवराम कारंथ यांच्या प्रकट मुलाखतीचा कार्यक्रम ५ ऑक्टोबर रोजी पुण्यातील कर्नाटक संघाचे वतीने आयोजित करण्यात आला होता. त्या प्रसंगी परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. श्री. ज. जोशी यांनी कारंथ यांना पुष्पहार घालून अभीष्टचिंतन केले.

श्री. सुधीर देव यांच्या पुढाकाराने नागपूर व इतरत्र ग्रंथप्रसाराचे कार्य 'माग्रस' या संस्थेमार्फत चालू आहे. दि. १२ डिसेंबर रोजी प्रा. प्रभाकर उर्ध्वरेषे यांच्या अध्यक्षतेने मराठी प्रकाशक परिषदेच्या सहकार्याने परिषदेने एक सभा आयोजित केली चित्रकार श्री. शि. द. फडणीस व सौ. फडणीस यांची विनोदी चित्रकारीसंबंधी भाषणे झाली.

परिषदेचे ज्येष्ठ कार्यकर्ते महाराष्ट्रकवी यशवंत यांच्या वयाला ९ मार्च रोजी ऐंशी वर्षे पूर्ण झाली. या निमित्ताने कार्याध्यक्ष श्री श्री. ज. जोशी व कार्यवाह श्री. म. श्री. दीक्षित यांनी त्यांचे निवासस्थानी जाऊन त्यांचे पुष्पगुच्छ देऊन अभीष्टचिंतन केले.

विद्यापीठ पातळीवरील आदर्श शिक्षक म्हणून पत्रिकेचे संपादक डॉ. हेमंत इनामदार यांना २६ जानेवारी रोजी राज्य पुरस्कार जाहीर झाला. या निमित्ताने परिषदेच्या पदाधिकाऱ्यांनी डॉ. इनामदार यांच्या घरी जाऊन त्यांचा सत्कार केला.

## मराठी–साहित्य–संमेलन :

जानेवारी १९७९ च्या पहिल्या आठवड्यात विदर्भातील चंद्रपूर येथे अखिल भारतीय मराठी साहित्याचे त्रेपन्नावे अधिवेशन प्रा. वामन कृष्ण चोरघडे यांचे अध्यक्षतेखाली भरले होते. परिषदेचे महामंडळावरील प्रतिनिधी म्हणून श्री. म. श्री. दीक्षित व प्रा. न. म. जोशी हे संमेलनाला उपस्थित होते.

## श्रद्धांजली :

वृत्तान्तकालात परिषदेचे व संमेलनाचे माजी दोन अध्यक्ष श्री. वि. द. घाटे व प्रा. ना. सी. फडके हे दिवंगत झाले.

कै. विठ्ठल दत्तात्रय घाटे यांना श्रद्धांजली अर्पण करण्यासाठी दि. ३ जून ७८ रोजी म. स. परिषदेच्या पटवर्धन सभागृहात सभा भरली होती. प्रा. गं. बा. सरदार अध्यक्षस्थानी होते. सर्वश्री मो. शा. शहाणे, वा. रा. ढवळे, प्रा. श्री. के. क्षीरसागर, सौ. संजीवनी मराठे, विद्याधर पुंडलिक, श्री. वा. रानडे, म. म. द. वा. पोतदार यांची श्रद्धांजली अर्पण करणारी भाषणे झाली. श्रद्धांजलीचा ठराव वाचून व सर्वांनी उभे राहून कै. घाटे यांना आदरपूर्वक श्रद्धांजली वाहिली.

विख्यात कादंबरीकार प्रा. ना. सी. फडके यांचे २२ ऑक्टोबर ७८ रोजी दुःखद निधन झाले. त्यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी भरत नाट्य संशोधन मंदिराच्या सहकार्याने २९ ऑक्टोबर ७८ रोजी भरत नाट्य मंदिरात शोक-सभा आयोजित केली होती. महापौर श्री. रामभाऊ वडके यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या सभेत श्री श्री. ज. जोशी, श्री. गोपीनाथ तळवलकर, श्री. ग. वा. बेहेरे, डॉ. वा. पां. बापट, डॉ. रा. शं. वाळिंबे, प्रा. म. वि. फाटक यांची भाषणे झाली. कै. फडके यांची कन्या सौ. अंजली हिने कुटुंबियांतर्फे कृतज्ञता व्यक्त केली. नंतर दुखवटा ठराव वाचून व उपस्थितांनी उभे राहून कै. फडके यांना श्रद्धांजली अर्पण केली.

## ग्रंथपारितोषिके :

काही देणगीदारांनी दिलेल्या ठेवरूप निधीच्या व्याजातून प्रतिवर्षी काही ग्रंथ-पारितोषिके परिषदतर्फे दिली जातात. गतवर्षातील पुढील पुस्तकांना पारितोषिके देण्यात आली.

‘ तळ्यातल्या सावल्या ’ ( कविता ) प्रा. पुरुषोत्तम पाटील, रु. १०० ( कै. ह. स. गोखले स्मृत्यर्थ ), ‘ महाराष्ट्राचा देव्हारा ’ डॉ. रा. चिं. ढेरे, प्रकाशक विश्वकर्मा साहित्यालय पुणे, व ‘ मोकळे आकाश ’ श्री. रवीन्द्र पिंगे, प्रकाशक प्रेस्टिज प्रकाशन, पुणे या ग्रंथांच्या प्रकाशकांना रु. १०० विभागून ( कै. अ. स. गोखले ‘रत्नाकर’चे

संपादक यांच्या स्मृत्यर्थ), 'निळी पहाट' - प्रा. ग. ग. जाधव, रु. १५० उत्कृष्ट ललितेतर ग्रंथ ( कै. विश्वनाथ-पार्वती गोखले स्मृत्यर्थ)

उत्कृष्ट कादंबरीस कै. ह. ना. आपटे स्मृत्यर्थ रु. १०० ची पारितोषिके १९७२ पासून न दिली गेलेली या वर्षी देण्यात आली. पुढील कादंबऱ्यांना ती मिळाली.

'निष्पर्ण वृक्षावर भर दुपारी' (ह. मो. मराठे), 'मुंबई दिनांक' (अरुण. साधू), 'सात सक्कं त्रेचाळीस' (किरण नगरकर), 'बिढार' (भालचंद्र नेमाडे), 'शहेनशहा' (ना. सं. इनामदार), 'रघुनाथाची बखर' (श्री. ज. जोशी), 'उच्छाद' (त्र्यं. वि सरदेशमुख)

कै. गिरिजा गंगाधर जांभेकर यांच्या स्मरणार्थ उत्कृष्ट संपादित ग्रंथास दिले जाणारे रुपये दीडशेचे पारितोषिक या वर्षी 'प्राचीन भारतीय विद्येचे पुनर्दर्शन' संपादक डॉ. रा. ना. दांडेकर व डॉ. चिं. ग. काशीकर या दोघा संपादकांना विभागून देण्यात यावयाचे आहे.

'काळकर्ते शिवरामपंत परांजपे ग्रंथपारितोषिक' रु. २५१ डॉ. रा. चिं. ढेरे यांच्या 'चक्रपाणी' या उत्कृष्ट गद्य ग्रंथास देण्यात आले.

वरील सर्व पारितोषिकांची निवड करण्याचे कामी डॉ. हेमंत इनामदार, प्रा. सौ. ललिता कुंभोजकर, प्रा. सौ. अंजली सोमण, प्रा. न. म. जोशी, प्रा. वसंत मिरासदार, श्री. य. गो. तथा दादा जोशी, श्री. मो. रा. वाळंबे, डॉ. स. गं. मालशे व डॉ. भीमराव कुलकर्णी यांचे बहुमोल साहाय्य झाले. परिषद या सर्वांची ऋणी आहे.

## वार्षिक साधारण सभा :

दि. २५ जून ७८ रोजी परिषदेची वार्षिक साधारण सभा प्रा. गं. बा. सरदार याचे अध्यक्षतेखाली सायंकाळी झाली. या सभेत १९७७-७८ चा कार्यवृत्तान्त, जमाखर्चपत्रके आणि ७८-७९ चा अर्थसंकल्प यांना मान्यता देण्यात आली. पंतप्रधान श्री. मोरारजी देसाई यांच्या भेटीसंबधीच्या वृत्तान्तावाबत श्री. ग. बा. बेहेरे यांनी आक्षेप घेतला. त्यावर उलटसुलट बरीच चर्चा झाली. शेवटी अध्यक्ष प्रा. गं. बा सरदार यांनी सभेच्या वृत्तान्तात या घटनेचा वस्तुस्थितिनिदर्शक गोषवारा द्यावा असे ठरले.

दि. २१ जानेवारी १९७९ रोजी सायंकाळी विशेष साधारण सभा झाली. या सभेत परिषदेच्या घटनेत सुचविलेल्या दुरुस्त्या संमत करण्यात आल्या. अध्यक्ष प्रा. गं. बा. सरदार या सभेच्या अध्यक्षस्थानी होते.

अनुक्रमणिका

### विशेष देणग्या :

माटुंगा (मुंबई) येथील मधुकर चॅरिटेबल ट्रस्ट या संस्थेतर्फे परिषदेस रुपये १०,००० ची विनशर्त उदार देणगी मिळाली. प्रस्तुत देणगीचा विनियोग तिच्या-वरील व्याजातून परिषदेच्या साहित्य व सांस्कृतिक कार्यासाठी करण्यात येईल.

कराडमध्ये १९७५ मध्ये झालेल्या म. साहित्य संमेलनाच्या उर्वरित निधीतून 'महाराष्ट्र वाङ्मयमंडळ' या निमंत्रित संस्थेने परिषदेस रु. ५००० ची देणगी दिली.

पुणे येथे १९७७ मध्ये झालेल्या म. साहित्य संमेलनाचे शिल्लक निधीतून रु. ३२०० ची देणगी संमेलन कार्यकारी मंडळाने परिषदेस दिली.

कराड व पुणे संमेलनांनी घटक संस्थेला देणगी देण्याची ही जी प्रथा सुरू केली ती स्वागतार्ह आहे.

वरील देणग्या देऊन परिषदेच्या कार्यास साहाय्यभूत झाल्याबद्दल मधुकर चॅरिटेबल ट्रस्ट, महाराष्ट्र वाङ्मयमंडळ, कराड, पुणे नगर वाचन मंदिर (निमंत्रक संस्था) व पुणे संमेलन कार्यकारी मंडळ यांची परिषद अतिशय ऋणी आहे.

### म. सा. महामंडळ :

वृत्तान्तकालात महामंडळाच्या हैदराबाद व चंद्रपूर (दोनदा) या ठिकाणी एकूण तीन सभा झाल्या हैदराबाद येथे झालेल्या सभेतील ठरावानुसार गेली सहा वर्षे परिषदेकडे असलेले मराठी साहित्य महामंडळाचे सर्व दप्तर विदर्भ साहित्य संघ नागपूर यांजकडे सुपूर्त करण्यात आले. हैदराबाद येथील महामंडळ सभेत संमेलन-विषयक नियमात महत्त्वाचे बदल करण्यात आले. महामंडळाच्या घटक संस्थेचे प्रतिनिधी (प्र. २५), समाविष्ट संस्थेचे प्रतिनिधी (प्र. १५), विद्यमान संमेलनाध्यक्ष, स्वागत मंडळाचे (५०) प्रतिनिधी- या प्रातिनिधिक मतदारसंघामार्फत यापुढे संमेलना-ध्यक्षाची निवड होईल. श्री. श्री. ज. जोशी, श्री. म. श्री. दीक्षित आणि प्रा. न. म. जोशी वरील सभांना उपस्थित होते.

### त्रैवार्षिक निवडणुका :

परिषदेच्या त्रैवार्षिक निवडणुका व्यवस्थितपणे पार पडल्या. नवे कार्यकारी मंडळ एप्रिल १९७९ पासून अस्तित्वात येईल. या निवडणुका पार पाडण्यासाठी कार्यकारी मंडळाने श्री व. ह. गोळे (अध्यक्ष), श्री. वि ग. तथा राजाभाऊ माटे आणि डॉ. प्र. चिं. शेजवलकर या तिघांचे निर्वाचन मंडळ नेमले होते निर्वाचन मंडळाने सर्व काम निःपक्षपातीपणे, दक्षतेने व आत्मीयतेने पार पाडले, याबद्दल परिषद त्यांची ऋणी आहे.

अनुक्रमणिका

## साभार भेटी :

त्रैमासिके : मराठी संशोधनपत्रिका, भारतीय इतिहास आणि संस्कृती व अस्मितादर्श.

द्वैमासिके : समाजप्रबोधनपत्रिका, युगवाणी, उन्नती, पंचधारा.

मासिके : आनंद, आलोचना, इये मराठीचिये नगरी, उद्यम, एकता, किर्लोस्कर किशोर, कुमार, क्रीडाखबर, प्रतिष्ठान, प्रसाद, बळीराजा, मधुकंस, मनोरा, मायमराठी, माहेर, मेनका, नवभारत, नामदेवहितवर्धक, नवनीत, रोहिणी, राजस, ललित, विशाखा, सन्मति, संपदा, सात्त्विकसमर्थ, स्वस्तिश्री, स्पॅन, ज्ञानोदय.

पाक्षिके : समाजपत्रिका, सोविएत देश, लोकराज्य व रुद्रवाणी.

साप्ताहिके : गोफण, दीनबंधू, विवेक, माणूस, मार्मिक, साधना, प्रतोद, प्रबोधचंद्रिका, प्रेरणा व मराठवाडा, महाराष्ट्र

दैनिके : सकाळ, संध्या, विशाल सह्याद्री, तरुणभारत (पुणे व नागपूर), गोमंतक, पूना डेली न्यूज (इंग्लिश)

## शाखा-सभा :

सातारा, सांगली, वाई, सोलापूर, अहमदनगर, कोल्हापूर, जळगाव आणि धुळे या आठ ठिकाणी परिषदेच्या शाखा आहेत. त्यांचे कार्य सर्वसाधारणपणे समाधानकारकरीत्या चालू आहे प्रा. द. ता. भोसले, श्री. वि. दि. वाघ, श्री. श्री. बा. आचार्य (सातारा) श्री. श्रीनिवास शिंदगी आणि श्री. य. द. लिमये (सांगली), श्री. दत्ता हलसगीकर, श्री. रा. त्र्यं. छत्रपती, श्री. यशस्विनी खाडिलकर, प्रा. राजशेखर हिरेमठ (सोलापूर), डॉ. व. स. जोशी (वाई), श्री. द. बा. डावरे, प्रा. व. के. दीक्षित, श्री. सुरेश जोशी (अहमदनगर); श्री. मा. ग. पातकर, श्री अशोक भोईटे (कोल्हापूर), प्रा. राजा महाजन, प्रा. ल. नी. छापेकर, प्रा. प्रभाकर चौधरी (जळगाव), प्रा. कुसुमाकर शिंपी, प्रा. ह. श्री. शेणोलीकर (धुळे) इत्यादी कार्यकर्ते परिषदेशी नेहमीच सहकार्य करीत असतात. शाखांचे कार्य चालण्यासाठी परिषदेच्या कार्यकारी मंडळाने घटनेत दुरुस्ती करून वर्गणीच्या ४० टक्के रक्कम शाखांना देण्याचा निर्णय घेतला. त्या निर्णयाची रीतसर कार्यवाही एप्रिल १९७९ पासून होणार आहे.

काही शाखांकडून संक्षिप्त वृत्तान्त आले ते येणेप्रमाणे—

कोल्हापूर : कै. वि. स. खांडेकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त नवोदित कवींची काव्यस्पर्धा, डॉ. भालचंद्र फडके आणि डॉ. ल. रा. नसिराबादकर यांची वाङ्मय

समीक्षात्मक तीन भाषणे. अध्यक्षस्थानी कुलगुरू, डॉ. भा. शं. भणगे होते. कै. ग. दि. माडगूळकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त प्राचार्य भगवंतराव देशमुख यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. सूर्यकांत खांडेकर व श्री. द. स. अंबपकर यांची भाषणे. सांगली : श्री. पु. भा. भावे यांचे ' ग. दि. मा. आणि मी ' या विषयावर व्याख्यान आणि प्रा. डॉ. ज. के. रानडे यांना श्रद्धांजली वाहणारी सभा. सातारा : प्रा. डॉ. आनंद यादव, प्रा. अविनाश सप्रे, डॉ. निर्मलकुमार फडकुले यांची शाखेला भेट, विद्यार्थ्यांसाठी समूहगीत व हस्ताक्षर स्पर्धा इत्यादी. सोलापूर : डॉ. वि. म. कुलकर्णी यांच्या ' रंगपंचमी ' या बालगीत संग्रहाचे प्रकाशन, रवींद्र पिंगे यांची परिषदेस भेट, कवी राजीवच्या ( चंद्रकांत महामुनी ) ' शतरूपा ' या काव्यसंग्रहाचे प्रकाशन ( देवदत्त प्रकाशन ), कै. चिं. त्र्यं. खानोलकर प्रथम स्मृतिदिन, सौ. राजेश्वरी आपटे, लक्ष्मण काटे, यांनी खानोलकरांच्या साहित्याविषयी विचार मांडले. आरती प्रभूंच्या कवितांचे वाचन झाले.

डॉ. कृ. शे. मार्डीकर यांच्या अध्यक्षतेखाली श्री. र. पा. देशपांडेरचित ' चरित्र शिवरायाचे ' या खंडकाव्याचे प्रकाशन, ' मी पाहिलेली अमेरिका ' या विषयावर श्रीमती इंदुमती अध्यापक यांचे भाषण, श्री. व्यंकटेश कामतकर व श्री. शिरीष देखणे यांच्या ' प्रास्पेरोची पेटी ' व ' नाटक ' या एकांकिकेचे वाचन, सौ. विजया जहागिरदार यांचे काव्यगायन, डॉ. यू. म. पठाण यांची परिषदेस भेट व ' संतांनी आम्हास काय दिले ' या विषयावर भाषण, म. सा. परिषद पुणे-कार्याध्यक्ष श्री. श्री. ज. जोशी व कार्यवाह श्री. म. श्री. दीक्षित यांची परिषदेस भेट, श्री. ग. वा. बेहेरे यांच्याशी साहित्यिक गप्पांचा कार्यक्रम, विषय–' साहित्यिकांची सामाजिक बांधिलकी ', श्री. शिरीष देखणे यांच्या ' जे. पी. फॉर ' या एकांकिकेचा कार्यक्रम, डॉ. वि. म. कुलकर्णी यांचा षष्ठ्यब्दीपूर्ती सत्कार समारंभ, ग. दि. मा. गीते ' चैत्रफुलोरा ' भावगीत गायनाचा कार्यक्रम–सादरकर्ते स्थानिक गायक कलावंत, कु. योगिनी जोगळेकर यांच्या ' रेषा ' या कथासंग्रहाचे प्रकाशन व कथाकथन, रत्नाकर मतकरीलिखित ' सुलतान ' ही एकांकिका, ' नाट्य आराधनाच्या ' कलावंतांकडून परिषदेतर्फे सादर, श्री. गं. बा. सरदार यांची साहित्य परिषदेस भेट, कथाकथन–सौ. सुरेखा शहा, राजेंद्र दास व नारायण सुमंत, ललित कोजागरीचा कार्यक्रम–काव्यवाचन, कथाकथन, गायन वगैरे, कै. ना. सी फडके यांना श्रद्धांजली वक्ते–श्रीमती शांता बुद्धिसागर, प्रा. यशस्विनी खाडिलकर, राजशेखर हिरेमठ, कै. कवी कुंजविहारी यांना श्रद्धांजली सोलापूरकरांच्या वतीने अध्यक्ष–महापौर श्री. सी. म. आडम, श्री. शं. गो पटवर्धन यांचा ८० वर्षे पूर्ण झाल्याबद्दल सत्कार व काव्यवाचन अध्यक्ष–प्रा. प्रभाकर विडवे, ' समर्थ रामदासांचे समाजचिंतन '

प्रा. प्रभाकर पुजारी यांचे भाषण. प्रा. हेमंत इनामदार यांचे "दीनांचा सोयरा पांडुरंग" या विषयावर भाषण.

अहमदनगर शाखेतर्फे कै. शंकरराव हतवळणे यांचे 'स्वचरित्र' प्रकाशन, संशोधन-शिबीर मेळावा, आकाशवाणी व दूरदर्शन यांच्या स्वायत्ततेबाबत भाषणे इत्यादी कार्यक्रम झाले.

**ऋणनिर्देश :**

परिषदेच्या सर्व कार्यात अनेक व्यक्ती, संस्था आणि पत्रकार यांचे नेहमीप्रमाणे सहकार्य लाभले. महाराष्ट्र शासनाचे शिक्षणखाते, साहित्य व संस्कृती मंडळ, पुणे महानगरपालिका यांच्या आर्थिक साहाय्यामुळे अनेक कामे करता आली. पण सर्वांपेक्षाही २०० रुपये अथवा १० रुपये देऊन ज्या व्यक्ती परिषदेच्या सभासद झाल्या त्यांच्या सहकार्याचे मोल विशेष आहे. मावळत्या कार्यकारी मंडळाच्या स्थानिक पदाधिकाऱ्यांनी सभासदवाढीचे व देणग्या मिळविण्याचे जे भरीव कार्य केले त्यामुळे संस्थेला साहित्यविषयक कामे करण्यासाठी सुमारे सात हजार रुपये उत्पन्न कायमचे मिळणार आहे.

परिषद वरील सर्वांची ऋणी आहे.

**म. श्री. दीक्षित**
**माधव कानिटकर**
**द. ता. भोसले**
कार्यवाह

दि. २३ मे १९७९

■

**साभार स्वीकार**

आळेकर सतीश : बेगम बर्वे, नीलकंठ प्रकाशन, पुणे ३०, १० रुपये
खानोलकर चिं. त्र्यं. : दुष्टचक्र, नीलकंठ प्रकाशन, पुणे ३०, १२ रुपये
रानडे भा. ल. : कमला काव्य (गद्यानुवाद), सांगली, ४ रुपये
दीक्षित म. श्री. '**प्रतापी बाजीराव**', थो. बाजीराव चरित्र मंडळ, सदाशिव, पुणे ३० : मूल्य ३० रु. (ट. खर्चासह).



# परिषद्‌-वार्ता

(एप्रिल व मे १९७९)

**स्मृतिदिन :**

(१) प्रतिवर्षाप्रमाणे १० एप्रिल १९७९ रोजी ज्ञानकोशकार डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांचा स्मृतिदिन परिषदेतर्फे पाळण्यात आला. सकाळी आठ वाजता कमला नेहरू उद्यानात डॉक्टरांच्या स्मृतिस्तंभावर पुष्पहार घालून श्रद्धांजली अर्पण करण्यात आली.

(२) १३ एप्रिल १९७९ रोजी कै. श्रीमंत भवानराव पंतप्रतिनिधी यांच्या स्मृतिदिनानिमित्त परिषदेच्या पटवर्धन सभागृहात कै. पंतप्रतिनिधींच्या प्रतिमेस पुष्पहार अर्पण करून श्रद्धांजली वाहण्याचा कार्यक्रम पार पडला. याप्रसंगी पंतकुटुंबीय आणि परिषदेचे कार्यकर्ते उपस्थित होते.

(३) परिषदेचे माजी कार्याध्यक्ष आणि म. सा. पत्रिकेचे संपादक कै. के. नारायण काळे यांच्या स्मृतिदिनानिमित्त दि. २३ एप्रिल १९७९ रोजी सायंकाळी परिषदेच्या पटवर्धन सभागृहात कै. काळे यांचे चिरंजीव श्री. प्रमोद काळे यांनी दिलेल्या छायाचित्राचे अनावरण अनौपचारिकरीत्या करण्यात आले. कै. काळे यांची मित्रमंडळी व कुटुंबीय याप्रसंगी उपस्थित होती. डॉ. वि रा. करंदीकर, प्रा. वि. भा. देशपांडे, श्री. माधव वझे, प्रा. अरविंद मंगरूळकर, श्री. म. श्री. दीक्षित इत्यादींनी कै. काळे यांच्या आठवणी सांगून त्यांना श्रद्धांजली वाहिली.

(४) महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांच्या अप्रकाशित रोजनिशीचा प्रकाशन समारंभ दि. २९ एप्रिल रोजी सकाळी भरत नाट्य-मंदिरात पार पडला. मराठवाडा साहित्य परिषद व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने हा प्रकाशन समारंभ साजरा झाला हे याचे एक वैशिष्ट्य होय. कै. महर्षी शिंदे यांची रोजनिशी प्रा. डॉ. गो. मा. पवार (मराठी विभागप्रमुख, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर)

अनुक्रमणिका






यांनी संपादित केली असून मराठवाडा साहित्य परिषदेने ती प्रकाशित केली आहे. मा. खासदार श्री. यशवंतराव चव्हाण यांचे हस्ते रोजनिशीचे प्रकाशन झाले. या प्रसंगी मा. श्री. शरद पवार ( मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य ) हे प्रमुख पाहुणे म्हणून समारंभास उपस्थित होते. परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. वि. रा. करंदीकर यांच्या प्रास्ताविकानंतर मा. यशवंतराव चव्हाण यांनी ग्रंथाचे प्रकाशन केले. त्यानंतर त्यांचे विचारपरिप्लुत भाषण झाले. मुख्यमंत्री श्री. शरद पवार यांनी प्रमुख पाहुणे म्हणून आपले विचार मांडले. समारंभाचे अध्यक्ष प्रा. गं. बा. सरदार यांचे भाषण झाल्यावर रोजनिशीचे संपादक डॉ. गो. मा. पवार यांनी संपादनाविषयी माहिती सांगितली. शेवटी मराठवाडा साहित्य-परिषदेचे कार्यवाह डॉ. प्रभाकर मांडे यांनी आभार मानले.

( ५ ) महाराष्ट्र ख्रिस्ती साहित्य परिषदेतर्फे 'संवाद' या साहित्य-विशेषांकाचे व इतर काही पुस्तकांचे प्रकाशन दि. १३।५।७९ रोजी सकाळी परिषदेच्या पटवर्धन सभागृहात झाले. ख्रि. रेव्ह. कवी ना. वा. टिळक यांच्या साठाव्या स्मृतिदिननिमित्त हा समारंभ आयोजित करण्यात आला होता. बिशप आब्रिओ हे या प्रसंगी उपस्थित होते. आरंभी रेव्ह. टिळक यांच्या छायाचित्रास बिशप आब्रिओ यांनी पुष्पहार अर्पण केला. श्री. रणदिवे यांचे भक्तिगीत गायनानंतर श्री. रॉक कार्व्हालो यांनी उपस्थितांचे स्वागत केले. त्यानंतर श्री. बिशप आब्रिओ यांनी विशेषांकाचे प्रकाशन केले. 'संवाद' या विशेषांकाविषयी श्री. सुनील आढाव आदी वक्त्यांनी निवेदन केले. या प्रसंगी मुद्दाम उपस्थित असलेले रेव्ह. टिळक यांचे नातू श्री. अशोक दे. टिळक आणि श्री. ग. वि. केतकर यांनी रेव्ह. टिळकांच्या काही आठवणी सांगितल्या. श्री. बिशप आब्रिओ आणि श्री. रॉक कार्व्हालो यांची भाषणे झाल्यावर श्रीमती विजया पुणेकर यांनी आभारप्रदर्शन केले.

परिषदेचे कार्यवाह श्री. म. श्री. दीक्षित यांनी शुभेच्छादर्शक भाषण केले व श्री आब्रिओ व श्री. रॉक कार्व्हालो यांचा पुष्पगुच्छ देऊन सत्कार केला.



महाराष्ट्र साहित्य

शेड्यूल IX

दिनांक १ एप्रिल १९७८ ते दिनांक

| १९७७-७८ रु. पै. | खर्च | रु. पै. | १९७८-७९ रु. पै. |
|---|---|---|---|
| | **मालमत्तेसंबंधी** | | |
| | भुई भाडे व म्यु. कर | ८०६-८० | |
| | इमारत दुरुस्ती | ३,०१०-७७ | |
| | विमा | १२०-०० | |
| १,८४२-९७ | फर्निचर, वस्तु-दुरुस्ती | ६१७-५६ | ४,५५५-१३ |
| | **व्यवस्थापन** | | |
| | पगार व प्रॉव्हिडंट फंड | १०,१४६-८१ | |
| | छपाई, टायपिंग व स्टेशनरी | २,२२२-५० | |
| | टपाल व दूरध्वनी | १,९८३-८५ | |
| | कार्यकारी मंडळ सभा | १,३७०-९० | |
| | प्रवास-प्रचार | ६३८-१० | |
| १८,४९०-४० | वीज | १,१२३-८२ | १७,४८५-९८ |
| ३५०-०० | **हिशोब तपासनीस** | | ३५०-०० |
| | **किरकोळ खर्च** | | |
| | आतिथ्य | ५६२-६५ | |
| | विश्वस्त खाते | २३-६० | |
| ९०२-४६ | इतर | १,१६३-४० | १,७४९-६५ |
| | **घसारा** | | |
| | इमारत २॥ टक्के | १,८१८-६६ | |
| | फर्निचर १० टक्के | १,०६२-८० | |
| ७,१५०-०९ | ग्रंथालय १० टक्के ... | ४,१९३-६० | ७,०७५-०६ |
| २८,६४५-९२ | बेरीज पुढील पानावर ओढली | रु. | ३१,२१५-८२ |

परिषद्, पुणे ४११ ०३०

नियम ( १ ) प्रमाणे

३१ मार्च १९७९ या वर्षाचे उत्पन्न-खर्च पत्रक

| १९७७-७८ रु. पै. | उत्पन्न | रु. पै. | १९७८-७९ रु. पै. |
|---|---|---|---|
| | **व्याज** | | |
| | सेव्हिंग्ज खात्यावरील | १,०२४-८८ | |
| ९,०२४-७१ | ठेवींवरील .... | १४,०८२-०४ | १५,१०६-९२ |
| २१३-१२ | **डिव्हिडंड** ... | | |
| ९९,२५-२० | **देणग्या** | | ३१,०७५-०० |
| | **अनुदाने** | | |
| | शासकीय | ८२०-०० | |
| | ग्रंथालय | २,५००-०० | |
| | " म. सा. पत्रिका " | | |
| २१,६२५-०० | (साहित्य संस्कृति मंडळ) ... | ८,०००-०० | ११,३२०-०० |
| | **इतर उत्पन्न** | | |
| | साधारण सभासद वर्गणी ... | ९,१४५-०० | |
| | संलग्न संस्था वर्गणी | ३९५-०० | |
| | " पत्रिका " वर्गणी व | | |
| | जहिरात | १,०२८-७५ | |
| २०,०५७-०० | परीक्षा | ४-९५ | १०,५७३-७० |
| | **किरकोळ जमा** | | १,०८२-१० |
| ८,८४१-७१ | **तूट** | | ९०९-६३ |
| | ( १९७८-७९ ताळेबंद वर्ग ) | | |
| ६९,६८६-७४ | | | ७०,०६७-३५ |
| ६९,६८६-७४ | बेरीज पुढे ओढली | | ७०,०६७-३५ |

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य

शेड्यूल IX

दिनांक १ एप्रिल १९७८ ते दिनांक

| १९७७-७८ रु. पै. | खर्च | रु. पै. | १९७८-७९ रु पै. |
|---|---|---|---|
| २८,६४५-९२ | मागील पानावरील बेरीज पुढे ओढलेली | | ३१,२१५-८२ |
| | **संस्थेच्या उद्देशांकरिता** | | |
| | साहित्य व सांस्कृतिक | | |
| | कार्यक्रम | ५,०६०-८८ | |
| | महामंडळ .... | १,७७३-०५ | |
| | शाखा-सभा हिस्सा | ९७४-६५ | |
| | परीक्षा | १२३-८० | |
| | म. सा. पत्रिका | १८,६७०-१० | |
| | ग्रंथालय | ३,२१६-८० | |
| | संशोधन | ८८८-५५ | |
| ४०,१३८-०७ | निवडणूक खर्च | ५,५००-६० | ३६,२०८-४३ |
| | **पारितोषिके** | | |
| | कै. ह. स. गोखले | १००-०० | |
| | कै. अ. स. गोखले | १००-०० | |
| | कै. वि. पा. गोखले | १५०-०० | |
| | कै. गि. गं. जांभेकर | ००-०० | |
| | ह. ना. आपटे | ७००-०० | |
| ५००-०० | शि. म. परांजपे | २५१-०० | १,३०१-०० |
| | **प्रकाशने** | | |
| | १९७८-७९ विक्री | १,०१३-४१ | |
| | दि. ३१-३-७९ चा साठा .... | ७,०२९-१६ | |
| | | ८,०४२-५७ | |
| ६९,२७३-९९ | बेरीज पुढील पानावर ओढली | | ६८,८२४-२५ |







परिषद, पुणे ४११ ०३०

नियम ( १ ) प्रमाणे

३१ मार्च १९७९ या वर्षाचे उत्पन्न-खर्च पत्रक

| १९७७–७८ रु. पै. | उत्पन्न | रु. पै. | १९७८–७९ रु. पै. |
|---|---|---|---|
| ६९,६८६–७४ | मागील पानावरील बेरीज पुढे ओढलेली | | ७०,०६७–३५ |
| ६९,६८६–७४ | बेरीज पुढे ओढली | | ७०,०६७–३५ |

**महाराष्ट्र साहित्य**

शेड्यूल IX

दिनांक १ एप्रिल १९७८ ते दिनांक

| १९७७–७८ रु. पै. | खर्च | रु. पै. | रु. पै. | १९७८–७९ रु. पै. |
|---|---|---|---|---|
| ६९,२७३–९९ | मागील पानावरील बेरीज पुढे ओढलेली | | | ६८,८२४–२५ |
| | वजा : | | | |
| | खर्च १९७८-७९ चा १६२–०० | | | |
| | दि. १-४-७८ चा | | | |
| ३१२–७५ | साठा | ८,०४२–५७ | ८,२०४–५७ | १६२–०० |
| | महामंडळ कार्यालय खर्च .... | | | १,०८०–१० |
| ६९,६८६–७४ | एकूण | रु. | | ७०,०६७–३५ |

आमच्या आजच्या तारखेच्या अहवालानुसार
पाटणकर अँड असोसिएट्स
चार्टर्ड अकौंटन्ट्स

पुणे
दिनांक २४–५–१९७९

एन. सी. भलगट
भागीदार

अनुक्रमणिका



परिषद्, पुणे ४११ ०३०

नियम ( १ ) प्रमाणे

३१ मार्च १९७९ या वर्षाचे उत्पन्न-खर्च पत्रक

| १९७७-७८ रु. पै. | उत्पन्न | रु. पै. | १९७८-७९ रु. पै. |
|---|---|---|---|
| ६९,६८६-७४ | मागील पानावरील बेरीज पुढे ओढलेली | | ७०,०६७-३५ |
| ६९,६८६-७४ | एकूण | रु. | ७०,०६७-३५ |

म. श्री. दीक्षित
माधव कानिटकर
द. ता. भोसले
कार्यवाह

पु. शं. पतके
कोषाध्यक्ष

लक्ष्मणशास्त्री जोशी
वि. त्र्यं. शेटे
वि. ग. माटे
विश्वस्त

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य

शेड्यूल VIII

दिनांक ३१ मार्च १९७९

| १९७७-७८ रु. पै. | निधी व देणी | रु. पै. | रु. पै. | १९७८-७९ रु. पै. |
|---|---|---|---|---|
| | **विश्वस्त निधी :** | | | |
| | मागील ताळेबंदावरून | | १,०७,२३१-४५ | |
| | १९७८-७९ मधील | | | |
| १,०७,२३१-४५ | आजीव सदस्य वर्गणी | | १४,७६७-०० | १,२१,९९८-४५ |
| | **इतर राखीव निधी :** | | | |
| | १. इमारत | | ८९,६४४-९८ | |
| | २. ग्रंथालय | | २३,५७३-१० | |
| | ३. हीरक महोत्सव प्रकाशने | | | |
| | मागील ताळेबंदावरून | २९,२७२-५४ | | |
| | १९७८-७९ मधील विक्री | ६२-२५ | | |
| | दि. ३१-३-७९ रोजीचा | | | |
| | साठा. | ४,१३८-७० | ३३,४७३-४९ | |
| | ४. वाङ्मयेतिहास योजना- | | | |
| | मागील ताळेबंदावरून | १,२०,१३४-१४ | | |
| | १९७८-७९ मधील | | | |
| | विक्री | ५,२९१-७५ | | |
| | दि. ३१-३-७९ रोजीचा | | | |
| | साठा. | ३,०४०-२० | | |
| | वजा : दि. १-४-७८ | १,२८,४६६-०९ | | |
| | चा साठा | ८,३३१-९५ | १,२०,१३४-१४ | |
| | ५. प्रकाशन निधी. ... | | ३३,०९१-२० | |
| १,०७,२३१-४५ | बेरीज पुढील पानावर ओढली | | | १,२१,९९८-४५ |

रिषद, पुणे – ४११ ०३०

नियम ( १ ) प्रमाणे

रोजीचा ताळेबंद

| १९७७–७८ रु. पै. | जिंदगी व येणी | रु. पै. | रु. पै. | १९७८–७९ रु. पै. |
|---|---|---|---|---|
| | **स्थिर जिंदगी :** | | | |
| | मागील ताळेबंदावरून ... | | १,०२,२५४–७० | |
| | **अधिक :** चालू वर्षांतील वाढ ... | | ५,४८४–०० | |
| | **वजा :** घसारा मागील | | १,०७,७३८–७० | |
| | वर्षापर्यन्तचा. | ३४,९८८–०२ | | |
| ६७,२६६–६८ | चालू वर्षाचा. | १,८१८–६६ | ३६,८०६–६८ | ७०,९३२–०२ |
| | **गुंतवणुका :** | | | |
| | **१. रोखे दर्शनी** | | | |
| | **किंमतीचे** | | | |
| | ३ टक्के कन्व्हर्शन लोन | | | |
| | १९४६ चे | ५,३००–०० | | |
| | ३ टक्के कन्व्हर्शन लोन | | | |
| ८,०००–०० | १९४६ चे. | २,७००–०० | ८,०००–०० | |
| | **२. शेअर्स :** | | | |
| | सें. प्रॉव्हिन्सेस रेल्वेज | | | |
| | ( १०० × २३ ) | २,३००–०० | | |
| | म. स्टेट को-ऑप. | | | |
| ३,५५०–०० | बँक लि. (५० × २५) | १,२५०–०० | ३,५५०–०० | ११,५५५–०० |
| | **फर्निचर व डेडस्टॉक** | | | |
| | मागील ताळेबंदावरून. | | ४०,२८९–५७ | |
| | + १९७८–७९ ची खरेदी. | | ... | |
| | | | ४०,२८९–५७ | |
| ७८,८१६–६८ | बेरीज पुढील पानावर ओढली | | | ८२,४८७–०२ |

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य

शेड्यूल VIII

दिनांक ३१ मार्च १९७९

| १९७७-७८ रु. पै. | निधी व देणी | रु. पै. | रु. पै. | १९७८-७९ रु. पै. |
|---|---|---|---|---|
| १,०७,२३१-४५ | मागील पानावरील बेरीज पुढे ओढलेली | | | १,२१,९९८-४५ |
| | ६. कै. विनायक कों. ओक स्मृतिदिन निधी | | १,०००-०० | |
| २,९९,९१६-८७ | ७. नाथमाव स्मृतिदिन निधी | | १,५००-०० | ३,०२,४१६-८७ |
| | **कर्जे :** | | | |
| ००-०० | तारणावरील वा तारण न दिलेली. | | | ००-०० |
| | **देणी :** | | | |
| | कै. जांभेकर पारितोषिक. | | १,०८०-०० | |
| | कै. विश्वनाथ पार्वती गोखले पारितोषिक | | ५,९३६-०० | |
| | कै. ह. ना. आपटे पारितोषिक | | १,०००-०० | |
| | कै. अंदुकाका भिडे पारितोषिक | | ५००-०० | |
| | कै. अ. स. व ह. स. गोखले पारितोषिक ... | | २,०००-०० | |
| | कै. शि. म. परांजपे पारितोषिक ... | | ३,५००-०० | |
| | सांगली शाखा पारितोषिक | | ४००-०० | |
| | ग्रंथालय अनामत. | | १०,३५६-०० | |
| | इतर देणी. | | ११,०९७-४४ | |
| ३२,४५३-०० | हिशोब तपासनीस. | | ३५०-०० | ३६,२१९-४४ |
| ४,३९,६०१-३२ | बेरीज पुढील पानावर ओढली .... | | रु. | ४,६०,६३४-७६ |

परिषद, पुणे - ४११ ०३०

नियम ( १ ) प्रमाणे

रोज्जीचा ताळेबंद

| १९७७-७८ रु. पै. | जिंदगी व येणी | रु. पै. | रु. पै. | १९७८-७९ रु. पै. |
|---|---|---|---|---|
| ७,८,८१६-६८ | मागील पानावरील बेरीज पुढे ओढलेली | | | ८२,४८७-०२ |
| | **वजा : घसारा** | | | |
| | मागील वर्षापर्यंतचा. | २९,६६१-३८ | ... | |
| १०,६२८-१९ | चालू वर्षाचा. | १,०६२-८० | ३०,७२४-१८ | ९,५६५-३९ |
| | **ग्रंथालय :** | | | |
| | मागील ताळेबंदावरून. | ५३,३३७-८५ | | |
| | + १९७८-७९ची खरेदी | ३,७३६-३० | ५७,०७४-१५ | |
| | **वजा : घसारा** | | | |
| | मागील वर्षापर्यंतचा | १५,१३८-२२ | | |
| ३८,१९९-६३ | + चालू वर्षाचा. | ४,१९३-६० | १९,३३१-८२ | ३७,७४२-३३ |
| | **शिल्लक साठा :** | | | |
| | प्रकाशने. | | ७,०२९-१६ | |
| | वाङ्मयेतिहास प्रकाशने. | | ३,०४०-२० | |
| २०,५७५-४७ | हीरक महोत्सव प्रकाशने | | ४,१३८-७० | १४,२०८-०६ |
| | **वाङ्मयेतिहास योजना :** | | | |
| | मागील वर्षापर्यंतचा खर्च. | | ६७,३३६-७५ | |
| ६७,३३६-७५ | + १९७८-७९ चा खर्च | | १,४४१-७० | ६८,७७८-४५ |
| २६०-०० | वीज बोर्ड अनामत, | | | २६०-०० |
| २४६-०० | आयकर वसुली. | | | २४६-०० |
| १,४४६-८७ | इतर येणी. | | | १,५७८-४८ |
| ५३७-१० | महामंडळ कार्यालय खर्च येणे. | | | |
| २,१८,०४६-६९ | बेरीज पुढील पानावर ओढली | | | २,१४,८६०-७३ |

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य

शेड्यूल VIII

दिनांक ३१ मार्च १९७९

| १९७७-७८ रु. पै. | निधी व देणी | रु. पै. | रु. पै. | १९७८-७९ रु. पै. |
|---|---|---|---|---|
| ४,३९,६०१-३२ | मागील पानावरील बेरीज पुढे ओढलेली | | | ४,६०,६३४-७६ |
| | **प्रॉव्हिडंट फंड :** | | | |
| | मागील ताळेबंदावरून | | ११,४४०-३५ | |
| | + १९७८-७९ ची जमा | | १,३८३-४५ | |
| | | | १२,८२३-८० | |
| ११,४४०-३५ | **वजा :** १९७८-७९ मध्ये परत केला. | | ३,०००-०० | ९,८२३-८० |
| ४,५१,०४१-६७ | | | एकूण रु. | ४,७०,४५८-५६ |

आमच्या आजच्या तारखेच्या रिपोर्टानुसार,
पाटणकर अँड असोसिएटस्,
चार्टर्ड अकौन्टंटस्करिता,
एन्. सी. भळगट / भागीदार.

पुणे,
दि. २४-५-१९७९.

अनुक्रमणिका

परिषद, पुणे – ४११०३०

नियम ( १ ) प्रमाणे

रोजीचा ताळेबंद

| १९७७–७८ रु. पै. | जिंदगी व येणी | रु. पै. | रु. पै. | १९७८–७९ रु. पै. |
|---|---|---|---|---|
| २,१८,०४६–६९ | बेरीज पुढील पानावर ओढलेली | | | २,१४,८६०–७३ |
| | **अखेर शिलका :** | | | |
| | रोख | | १४०–१७ | |
| | बँक ऑफ महाराष्ट्र (सेव्हिंग्ज) | | ६,४४८–१० | |
| | बँक ऑफ महाराष्ट्र ( टेवी ) | | ३९,९००–०० | |
| | गोखले बंधू पारितोषिक ( ठेव ) ... | | २,०००–०० | |
| | शि.म. परांजपे पारितोषिक (ठेव) .... | | ३,५००–०० | |
| | ग्रंथालय अनामत ( टेव ) | | १,०००–०० | |
| | स्टेट बँक विश्वस्त (सेव्हिंग्ज) | | २,४६०–३२ | |
| | स्टेट बँक ( ठेव ) | | १५,८००–०० | |
| | स्टेट बँक ( ठेव ) | | ५४,२००–०० | |
| | बँक ऑफ बडोदा ( ठेव ) | | २५,०००–०० | |
| | बँक ऑफ बडोदा (सेव्हिंग्ज) | | ३,३९८–०२ | |
| | बँक ऑफ बडोदा ( करंट ) | | ९६२–९३ | |
| | प्रॉव्हिडंट फंड ( टेवी ) | | ४,८००–०० | |
| १,४२,९४०–१२ | प्रॉव्हिडंट फंड (सेव्हिंग्ज) | | ५,०२३–८० | १,६४,६३३–३४ |
| | **तूट :** | | | |
| | मागील ताळेबंदावरून. | | ९०,०५४–८६ | |
| ९०,०५४–८६ | + १९७८–७९ ची तूट | | ९०९–६३ | ९०,९६४–४९ |
| ४,५१,०४१–६७ | | | एकूण... रु. | ४,७०,४५८–५६ |

**म. श्री. दीक्षित**
**माधव कानिटकर**
**द. ता. भोसले**
कार्यवाह

**पु. शं. पतके**
कोषाध्यक्ष.

**लक्ष्मणशास्त्री जोशी**
**वि. त्र्यं. शेटे**
**वि. ग माटे**
विश्वस्त.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



**महाराष्ट्र साहित्य**

अर्थसंकल्प

जमा

| खाते | संकल्प १९७८–७९ रु. | प्रत्यक्ष १९७८–७९ रु. पै. | संकल्प १९७९–८० रु. |
|---|---|---|---|
| व्याज व डिव्हिडंड | १०,००० | १५,१०६–९२ | १५,००० |
| देणग्या | ८,००० | *२७,८७५–०० | १५,००० |
| शासकीय अनुदान | ५,००० | ८२०–०० | ५,००० |
| महानगरपालिका अनुदान | ५०० | — | १,००० |
| साहित्य संस्कृति मंडळ ( " पत्रिका " अनुदान ) | ८,००० | ८,०००–०० | ८,००० |
| ग्रंथालय अनुदान | २,००० | २,५००–०० | २,५०० |
| साधारण सभासद वर्गणी | ११,००० | ९,१४५–०० | ९,००० |
| संलग्न संस्था वर्गणी | १५० | ३९५–०० | ३०० |
| " पत्रिका " वर्गणी व जाहिरात | ४,०००. | १,०२८–७५ | २,००० |
| परीक्षा | २,००० | ४–९५ | — |
| किरकोळ | ३०० | १,०८२–१० | ३०० |
| प्रकाशन विक्री | १,००० | १,०१३–४१ | १,००० |
| संमेलन | २,००० | ३,२००–०० | २,००० |
| विश्वस्तांकडून ठेवीवरील उत्पन्न | १२,००० | १५,०००–०० | १०,००० |
| तूट | १२,२०० | ९०९–६३ | १३,५०० |
| रु. | ७८,१५० | | ८४,६०० |

*** देणग्या [ तपशील ] :**

मधुकर चॅरिटेबल ट्रस्ट रु. १०,०००+कराड संमेलन रु.५,००० + इतर रु.१२,८७५ = २७,८७५ रु.

अनुक्रमणिका






परिषद, पुणे ४११ ०३०

१९७९–८०

खर्च

| खाते | संकल्प १९७८–७९ रु. | प्रत्यक्ष १९७८–७९ रु. पै. | संकल्प १९७९–८० रु. |
|---|---|---|---|
| कर व भुईभाडे | ५०० | ८०६–८० | ५०० |
| इमारत दुरुस्ती व विमा | ४,००० | ३,१३०–७७ | १०,००० |
| फर्निचर व इतर वस्तू | २,००० | ६१७–५६ | १,००० |
| पगार व प्रॉव्हिडंड फंड | ११,००० | १०,१४६–८१ | १२,००० |
| छपाई, टायपिंग व स्टेशनरी | २,५०० | २,२२२–५० | २,५०० |
| टपाल व दूरध्वनी | ३,००० | १,९८३–८५ | २,५०० |
| कार्यकारी मंडळ सभा | १,६०० | १,३७०–९० | २,००० |
| निवडणूक | ४,००० | ५,५००–६० | २,५०० |
| प्रवास व प्रचार | १,००० | ६३८–१० | १,००० |
| वीज | १,५०० | १,१२३–८२ | १,५०० |
| हिशोब तपासनीस | ३५० | ३५०–०० | ४०० |
| आतिथ्य | ६०० | ५६२–६५ | ६०० |
| विश्वस्त व्यवहार | १०० | २३–६० | १०० |
| किरकोळ | ५०० | १,१६३–४० | १,००० |
| घसारा | ७,२०० | ७,०७५–०६ | ८,००० |
| साहित्य व सांस्कृतिक कार्यक्रम | ५,००० | ५,०६०–८८ | ५,००० |
| महामंडळ सभा व वर्गणी | ३०० | १,७७३–०५ | १,००० |
| शाखासभा–हिस्सा | २,००० | ९७४–६५ | १,५०० |
| परीक्षा | २,००० | १२३–८० | — |
| पत्रिका | २०,००० | १८,६७०–१० | २०,००० |
| ग्रंथालय व्यवस्था | ५,००० | ३,३१६–८० | ३,५०० |
| संशोधन | ३,००० | ८८८–५५ | १,००० |
| प्रकाशने | ५०० | १६२–०० | ५०० |
| पारितोषिके | ५०० | १,३०१–०० | १,५०० |
| साहित्यिक मेळावे व शाखा संमेलने | — | — | ५,००० |
| | रु. ७८,१५० | | ८४,६०० |

पु. शं. पतके
कोषाध्यक्ष

म. श्री. दीक्षित / माधव कानिटकर / द. ता. भोसले
कार्यवाह

अनुक्रमणिका

## परिषदेचे नवे कार्यकारी मंडळ, पदाधिकारी आणि विश्वस्त
## ( १९७९ ते १९८२ )

अध्यक्ष : प्रा. वसंत कानेटकर, नाशिक

उपाध्यक्ष : श्री. ग. ल. ठोकळ, प्रा. म. ना. अदवन्त आणि
प्रा. द. मा. मिरासदार

कार्याध्यक्ष : प्रा. डॉ. वि. रा. करन्दीकर

कोषाध्यक्ष : श्री. पु. शं. पतके

कार्यवाह : श्री. म. श्री. दीक्षित, श्री. माधव कानिटकर आणि प्रा. डॉ. द. ता. भोसले

पत्रिका संपादक : प्रा. डॉ. आनंद यादव

सभासद : प्रा. न. म. जोशी, प्रा. वसंत मिरासदार, प्रा. डॉ. व. दि. कुलकर्णी,
प्रा. राम शेवाळकर, श्री. दत्ता हलसगीकर, प्रा. ह. श्री. शेणोलीकर,
प्रा. डॉ. वसंत के. दीक्षित, प्रा. म. वि. फाटक, प्रा. डॉ. वसन्त सावन्त,
श्री ग. वा. बेहेरे, प्रा. गो. म. कुलकर्णी.

विश्वस्त : तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी, श्री. वि. त्र्यं. शेटे, श्री. वि. ग. माटे

पत्ता : टिळक रस्ता, पुणे ३०, दूरध्वनी : ४४२९६३
कार्यालयाची वेळ : सकाळी ८ - ३० ते ११ - ३०
सायंकाळी ४ - ३० ते ८ ( दर मंगळवारी सुटी )

सभासदांना विनंती : ( १ ) वार्षिक सभासदांनी १० रु. वर्गणी त्वरित पाठवावी. वर्गणी न आलेल्यांना अंक पाठविता येत नाहीत हे कृपया ध्यानी घ्यावे.
( २ ) ज्यांना घटनेची छापील प्रत हवी असेल त्यांनी पत्राने कळविल्यास प्रत पाठविली जाईल टपाल खर्च ४० पैसे पाठवावा.

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका